# दीपस्तंभ

लेखक

आबाद शाहपुरी

भाषांतर

सय्यद ज़ाकिर अली

*''असीम दयावंत व कृपावंत अल्लाहच्या नावाने''*

# प्रस्तावना

प्रत्येक राष्ट्राला इतिहास असतो. परंतु या जगामध्ये मुस्लिमांच्या इतिहासापेक्षा जास्त प्रमाणित इतिहास जगातील कोणत्याही राष्ट्राजवळ नाही. तसेच इस्लामने जीवनाचरण आणि नीतिमत्तेची जी शिकवण आपल्या अनुयायांना दिली आहे, तिचे काटेकोर पालन करणारे प्रत्येक काळामध्ये पाहावयास मिळतात. त्यामुळे संपूर्ण विश्वात मुस्लिमांचे एक लक्षणीय असे वैशिष्ट्य आहे. असे उदाहरण इतर कोणत्याही धर्म किंवा राष्ट्रात पाहावयास मिळणे कठीण आहे. या महात्म्यांनी आपल्या सदाचरण आणि नीतिमत्तेचे दीप प्रज्वलीत करून संपूर्ण जगाला मार्गदर्शनात्मक प्रकाशमान करण्यासाठी आपले रक्त सांडले. या व्यक्ती निश्चितच प्रेषित येशू मसीह (अ) यांच्या शब्दांनुसार, जमिनीचे पीठ आणि दीपस्तंभ होते. यांच्यामुळे केवळ तत्कालीन जगाने सत्य मार्गदर्शनास्तव तेजोमय कांति मिळविली नसून सध्याच्या आधुनिक युगातील घणघोर तिमिरांमध्येसुद्धा त्यांच्या सदाचरणाच्या किरणांनी मनुष्य आपले जीवन प्रकाशमान करू शकतो. या अगणित व्यक्तींपैकी आम्ही या कांतिपुस्तिकेत केवळ मोजक्याच व्यक्तींचा उल्लेख करीत आहोत.

ही छोटीशी पुस्तिका केवळ आचरणकथांचा संग्रह नसून सत्य विचारशैली आणि दूरदृष्टीपूर्ण प्रशिक्षण व प्रामाणिकता आणि सुधारणा साहित्यसुद्धा असून सत्यमार्गात प्रयत्न करणाऱ्यांसाठी श्रद्धेची तीव्र प्रेरणा आणि प्रोत्साहनाने ओतप्रोत आहे.

आपला

आबाद शाहपुरी

(३० नोव्हेंबर १९७४)

प्रकरण पहिले

# धैर्य आणि निश्चयाचे महान पर्वत

"जर आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांनी ह्या व्यक्तींना पाहिले असते तर खूप हर्षित झाले असते." (अब्दुल्लाह बिन उमर (र))

## (१)

'उमय्या' वंशाच्या हाती जगाची सत्ता आली आहे. त्यांच्या शक्ती व सामर्थ्यापुढे कोणातही तग धरण्याचे धैर्य नाही. त्यांनी मुस्लिमांवर तलवारीच्या जोरावर प्रभुत्व मिळविलेले आहे. त्यांच्यासमोर सत्यवचन करणारा त्यांना असहनीय आहे. मुखाद्वारे सत्यवचन काढणे म्हणजे आपले प्राण गमावण्यासम आहे. केवळ 'मरवानपुत्र' बादशाहच नव्हे, तर शाही परिवार आणि तेथील नोकरचाकरदेखील सत्तेच्या उन्मादात मस्तावलेले आहेत. रयतेवर अन्याय करणे ही त्यांच्या जीवनाची जीवनचर्या बनली आहे. मरवानवंशीय बादशाहचा पत्रवाहक 'सीरिया' येथून 'मदीना' शहरी पोहोचतो. त्याच्या राहणीमानावरून व पोषाखावरून त्याच्या गर्विष्ठपणाचे दर्शन घडत आहे. तो बाजारातून जाताना आपल्या सभोवताली सत्ताधिकाऱ्यासारखी दृष्टी टाकतो. एका दुकानावर एक वयोवृद्ध गृहस्थ बसलेले आहेत. ते त्यास रोखून म्हणतात,

"कदाचित तुम्ही उमय्याच्या शाही परिवाराचे पत्रवाहक आहात!"

"होय ! मी त्यांचा सेवक आहे !" पत्रवाहक तिरप्या नजरेने त्यांना पाहत उत्तर देतो. त्याच्या माथ्यावर आठ्या पडलेल्या आहेत.

"मरवान परिवाराचे कसे काय चालले आहे?" त्याच्या गर्विष्ठ नजरेची पर्वा न करता ते वयोवृद्ध गृहस्थ विचारतात.

"कुशल आहेत" त्याने उत्तर दिले.

"हुं ! कुशल आहेत ? ते माणसांना उपाशी ठेवतात आणि कुत्र्यांची पोटे भरतात !"

पत्रवाहक त्यांच्यावर क्षुब्ध होतो. त्याच्या अंगाचा तिळपापड होतो आणि दरडावतो,

"शुद्धीत आहात काय? तुम्ही कोणाच्या बाबतीत बोलता आणि कोणाशी बोलता याचे भान आहे काय? चला उठा ! आता तुम्हाला दाखवावाच लागेल मरवान परिवाराचा दणका."

ते वृद्ध गृहस्थ अतिशय शांत व गंभीरपणे बसलेले आहेत. त्यांच्यावर त्याच्या दरडावण्याचा काहीच परिणाम झालेला दिसत नाही. पत्रवाहक शाही आदेशात परत कडाडतो,

"उठता बऱ्या बोलाने की खेचून नेऊ !"

त्याच्या कडाडण्याने संपूर्ण बाजारात भयाण शांतता पसरलेली आहे. कारण लोक उमय्या बादशाहीच्या क्रोधाचा अर्थ चांगलेच समजत होते. कोणीही पुढे सरसावून प्रकरणास मिटविण्याचे धाडस करू शकत नव्हते. केवळ 'मुतल्लिब बिन साइब' नावाची व्यक्ती या वृद्धासह आहे. ते मोठ्या मुश्किलीने तापलेले वातावरण थंड करण्याचा प्रयत्न करतात. पत्रवाहक त्यांना क्रोधित नजरेने पाहत निघून जातो. 'मुत्तलिब' त्या वृद्ध ग्रहस्थांना म्हणतात,

"हे सईद ! ईश्वर तुमच्यावर दया करो, कशासाठी स्वत:च्या जीवावर बेतून घेत आहात?"

वृद्ध गृहस्थ अगदी शांतपणे उत्तर देतात,

"वेड्या, कशा गोष्टी करतोस. जोपर्यंत मी ईश्वराच्या अधिकारांचे रक्षण करीन, तोपर्यंत ईश्वर मला त्यांच्या स्वाधीन होऊ देणार नाही."

हे आहेत 'सईद बिन मुसैयिब' ताबेई (प्रेषितसोबत्यांचे शिष्य) आणि अतिमहान व प्रतिष्ठित इस्लामी विधिज्ञ, त्या पवित्र अंत:करणाच्या लोकांपैकी एक, ज्यांनी आपल्या ज्ञान आणि सद्कार्यांनी संपूर्ण जगात नाव मिळविले. मोठमोठे विद्वान आणि विचारवंत त्यांच्या विद्वत्तेने प्रभावित झाले. त्यापैकी प्रेषितसोबतीही आहेत, तसेच समकालीन विद्वान व सोबतीशिष्य आहेत. माननीय अब्दुल्लाह बिन उमर (र) यांना कोणी धर्माच्या बाबतीत एखादा प्रश्न विचारल्यास ते 'सईद बिन मुसैयिब'कडून मार्गदर्शन घेण्याचा सल्ला देत असे. कारण त्यांना शुद्ध चारित्र्यवानांचे सान्निध्य लाभले होते. 'अली इब्नुल हुसैन' त्यांच्या बाबतीत म्हणत असत की, 'सईद बिन मुसैयिब' यांना 'आसार' चे सखोल ज्ञान होते (अर्थात प्रेषित सोबत्यांनी इस्लामी विधीनुसार केलेल्या कर्मांचे ज्ञान). माननीय 'कतादा' यांचे मत आहे की, 'मी निषिद्ध आणि वैधचे त्यांच्यापेक्षा मोठे ज्ञानी व विद्वान पाहिले नाही. आपल्या काळातील सर्वांत महान हदीसशास्त्राचे (प्रेषितवचनशास्त्राचे) विद्वान आहेत. ते म्हणतात की,'मी ज्ञानाच्या संशोधनास्तव संपूर्ण मुस्लिम जगाचा प्रवास केला, परंतु 'सईद बिन मुसैयिब' यांच्यासारखा प्रगल्भ विद्वान मी कधी व कोठेही पाहिला नाही.

'सईद' यांचे वडील, 'मुसैयिब (र)' आणि आजोबा 'अहज़न (र)' या दोघांनी मक्का विजयाच्या वेळी प्रेषित मुहम्मद (स) यांच्या हातावर इस्लाम स्वीकारला होता. माननीय उमर (र) यांच्या शासनकाळात १५ हिजरी सनात जन्मले. या काळामध्ये मदिना शहरात वास्तव्यास असलेल्या प्रेषितसोबत्यांचे प्रगल्भ ज्ञान व पवित्र आचरणाचा सुगंध दरवळत होता. याच सुगंधाने 'सईद' हेसुद्धा लाभ घेत होते. माननीय अली (र), माननीय अब्दुल्लाह बिन उमर (र), माननीय अबू हुरैरा, साअद, इब्ने अब्बास, अबू दरदा, सुहैब, जाबिर, अबू सईद खुदरी, अस्मा, मातावर्य आयशा व उम्मे सलमा (र) यांच्यासारख्या गुरुवर्यांकडून ज्ञानलाभ घेतला. ईश्वराने त्यांना प्रचंड

स्मरणशक्ती प्रदान केली होती. एकदा ऐकलेली कोणतीही गोष्ट त्यांच्या स्मरणपटलावर कोरली जात असे. मदीना शहराच्या या पवित्र आणि ज्ञानवर्धक वातावरणात ऐन तारुण्यातच ते ज्ञान सिंहासनावर विराजमान झाले व ज्ञानार्थी आणि ज्ञानदात्यांच्या आकर्षणाचे केंद्र बनले. 'उमर बिन अब्दुल अज़ीज़', मुहम्मद इब्ने शहाब जहरी, अमरू बिन दिनार, अता बिन रिबाह, मुहम्मद बिन बाक़र आणि यहया बिन सईद यांच्यासारखे सद्‌वर्तनी आणि महान विधिज्ञ त्यांचेच शिष्य होत.

## (२)

जीवनाचा आरंभीचा काळ सोडल्यास 'सईद बिन मुसैयिब' यांचा जीवनकाळ राजकीय ओढाताणीमुळे खूपच कठीण गेला. या कठीण काळामध्ये त्यांनी स्वत:स राजकीय धामधुमीतून अलिप्त ठेवून शैक्षणिक क्षेत्रात मोठे कार्य केले. परंतु जेव्हा 'अब्दुल्लाह बिन जुबैर (र) आणि उमैया वंशामध्ये राजकीय संघर्ष सुरू झाला, तेव्हा हेसुद्धा या संघर्षांच्या कचाट्यात सापडले. जुबैरी परिवार आणि उमैया परिवाराचा हा सत्याधिष्ठित शासन व असत्याधिष्ठित शासनाचा अंतर्गत संघर्ष एवढा जीवघेणा होता की, यामध्ये शहरेच्या शहरे उद्ध्वस्त झाली. दोन्ही पक्ष आपापल्या सत्तासीमा वाढविण्यात मग्न होते. या हेतुस्तव शहरातील सर्व मान्यवरांना आपल्यासोबत घेऊन त्यांची मर्जी मिळविण्याचा प्रयत्न दोन्ही पक्ष करीत होते. विशेषत: जे लोक जनतेच्या श्रद्धात्मक नेतृत्वाचे केंद्रबिंदु असत त्यांचा पाठिंबा मिळविण्याकरिता आटोकाट प्रयत्न करीत होते. 'सईद बिन मुसैयिब' या संघर्षामध्ये पूर्वीप्रमाणेच तठस्थ होते. ही तठस्थता दोन्ही पक्षांसाठी असहनीय बाब होती.

अब्दुल्लाह बिन जुबैर (र) यांच्या शासनातर्फे मदीनेचा राज्यपाल 'जाबिर बिन असवद' हा होता. त्याने 'सईद' यांच्यावर जुबैर (र) यांच्या समर्थनासाठी विनंती केली. परंतु 'सईद' यांनी म्हटले की, 'जोपर्यंत मुस्लिम जनसमुदाय कोणत्याही एका पक्षाच्या समर्थनात येत नाही, तोपर्यंत मी कोणाचेही समर्थन करणार नाही. या राज्यपालास त्यांच्याशी खुन्नस असल्याने त्याने बळजबरीचा प्रयत्नसुद्धा केला. या राज्यपालाच्या चार पत्नीदेखील होत्या. पैकी एकीस तलाक दिल्यावर इद्दतीच्या मुदतीपूर्वीच त्याने पाचवा विवाह करून टाकल्याने 'सईद' यांनी त्याची कानउघाडणी करताना त्याचे हे कृत्य निषिद्ध असण्याचा फतवा दिला होता. या जुन्या खुनशीचा बदला घेण्याची ही चांगली संधी त्यास मिळाली होती. त्याने 'सईद' यांना तब्बल साठ कोरडे ओढले. 'सईद' रक्तबंबाळ झाले. परंतु एखाद्या तठस्थ पर्वताप्रमाणे धैर्याचा पुरावा दिला. कोरडे खाताना ते म्हणत होते,

"तू चौथीची (चौथ्या पत्नीची) इद्दत पूर्ण होण्यापूर्वीच पाचवीशी विवाह का केलास? तू ईश्वराच्या आदेशाचे उल्लंघन केलेस ! लवकरच तुझा परिणाम वाईट होईल."

अब्दुल्ला बिन जुबैर (र) यांना ही वार्ता कळाली, तेव्हा त्यांनी 'जाबिर'ची कडाडून कानउघाडणी केली.

काही मुदतीनंतर 'अब्दुल्लाह बिन जुबैर (र) हे हुतात्मा झाले आणि इस्लामी जगतावर उमय्या वंशाची जुल्मी सत्ता लागू झाली. 'सईद बिन मुसैयिब' यांच्यावर या शासनकाळातसुद्धा खूप संकटे आली. उमैया परिवाराचे शासक ईश्वरीय आदेशाचे सर्रास उल्लंघन करीत होते आणि 'सईद' त्यांना न घाबरता आणि जिवाची पर्वा न करता त्यांच्यावर सडेतोड टीका करीत असत.

सईद आणि उमय्या शासकांदरम्यानच्या मतभेदांची सुरुवात 'वलीद' याच्या सत्तावारसाच्या विषयावरून झाली. बापाच्या मृत्युपूर्वीच राजपुत्राच्या राज्यभिषेकाची उमय्या परिवाराची जणू परंपराच झाली होती. "अब्दुल मलिक' हा बादशाह राजकुमार वलीद आणि त्यानंतर दुसरा राजकुमार 'सुलैमान'चा राज्याभिषेक आपल्या मृत्युपूर्वीच करू इच्छित होता. म्हणून प्रत्येक ठिकाणच्या राज्यपालांना शाही आदेश पाठविला की, जनतेकडून या दोन्ही राजकुमारांच्या समर्थनार्थ मतदान घ्यावे. 'मदीना' शहराचा राज्यपाल हश्शाम बिन इस्माईल याने संपूर्ण शहरवासीयांना राजकुमारासाठी मतदान करण्यासाठी आमंत्रित केले. परंतु 'सईद बिन मुसैयिब' यांनी स्पष्टपणे सांगितले की, 'बादशाह जिवंत असताना राजकुमाराच्या राज्याभिषेकास्तव मी मतदान करणार नाही, कारण हे इस्लामविरोधी कृत्य आहे.' शेवटी राज्यपालाने त्यांच्यासमोर तीन पर्याय ठेवले. प्रथम पर्याय असा की, मतदानाचा शाही आदेश मतदात्यांसमोर वाचून दाखवावा. परंतु 'सईद बिन मुसैयिब' तठस्थ राहिले. द्वितीय हे की, काही दिवसांकरिता त्यांनी घराबाहेर पडू नये. जोपर्यंत शासनानिर्णयाच्या समर्थनार्थ जनता मतदान करीत नाही तोपर्यंत घराबाहेर पडू नये. अथवा तिसरा पर्याय, एखाद्या मस्जिदीमध्ये जावे, जेणेकरून कोणी त्यांचे मत ऐकू नये. त्यांना मौन धारण केलेले पाहून लोक हे समजतील की, त्यांनी शासकीय आदेशाच्या समर्थनार्थ मतदान केले. दुसऱ्या पर्यायाचा अर्थ असा होईल की, ते घराबाहेर न पडण्यामुळे मस्जिदमध्ये जाऊन सामुदायिक नमाज पढण्यास मुकतील. आणि तिसरा पर्याय स्वीकार केल्यास त्याचा अर्थ असा होईल की, ते भ्याड आहेत. ते निर्भीडपणे आपले मत मांडू शकत नाहीत.

'सईद' यांना चांगलेच ठाऊक होते की, शाही आदेशाचे उल्लंघन करण्याचा परिणाम किती भयानक होणार आहे ! परंतु ते कोणत्याही आणि कितीही भयानक परिणामांना न जुमानता निश्चयाच्या महाकाय पर्वताप्रमाणे तठस्थ राहिले. राज्यपालाने त्यांना पन्नास कोरडे ओढून रक्तबंबाळ केले आणि शहरभर त्यांची धिंड काढली. हे पाहून काही जण म्हणत, 'हा तर 'सईद' यांचा घोर अपमान आहे.' यावर ते लोकांना उत्तर देत असत की, 'मी अंतिम निवाड्याच्या दिवशी होणाऱ्या अपमानापासून सुरक्षित राहण्यासाठी हा अपमान सहन केला.' एवढे अन्याय व अत्याचार करूनही 'सईद बिन मुसैयिब' मुळीच प्रभावित झाले नाहीत. म्हणून शेवटी राज्यपालाने त्यांची मान छाटण्याची धमकी दिली. या धमकीला वास्तवात रुपांतर करण्यासाठी त्यांना वधस्थानी नेण्यात आले. सईद देहदंड स्वीकारण्यासाठी तयार झाले. परंतु त्यांना देहदंड न देता कैदेत टाकण्यात आले.

कैदेत टाकल्यानंतरसुद्धा त्यांच्या सोबत्यांकरवी त्यांचे मतपरिवर्तन करण्याचे प्रयत्न केले गेले. त्यांचे स्नेही त्यांना समजावण्याचा प्रयत्न करीत आणि म्हणत की, "हे सईद ! तुमची बुद्धी भ्रष्ट झाली आहे." परंतु ते आपले स्नेही 'अबू बकर' यांना उत्तर देतात, "हे अबू बकर ! ईश्वराचे भय बाळगा. त्यालाच सर्वांपेक्षा सर्वशक्तिमान व सामर्थ्यशाली जाणावे." अबू बकर त्यांना परत आणखीन एकदा म्हणतात, "हे सईद ! डोके ठिकाणावर ठेवा. तुम्ही जुलमी शासनाशी टक्कर घेण्याचा मूर्खपणा करता आहात." यावर 'सईद' उत्तर देतात की, 'हे अबू बकर ! तुमचे हृदय आणि डोळे दोन्ही निकामी झालेत." हे ऐकून त्यांचे स्नेही मित्र निराश होऊन परत निघाले. राज्यपाल हश्शामने विचारले की, "अबू बकर ! सईद यांच्या भूमिकेत काही बदल झाला काय?" अबू बकर यांनी उत्तर दिले, "ते तर आणखीनच तठस्थ झाले आहेत."

राज्यपाल हश्शामने सईद बिन मुसैयिब यांच्या बाबतीत संपूर्ण वृत्तान्त शासनकर्ता अब्दुल मलिकला पाठविला. अब्दुल मलिकने आपल्या खाजगी सचिव 'क़बीसा बिन झुऐब'च्या सल्ल्याने हश्शामची खूप कानउघाडणी केली आणि लिहून पाठिवले की, सईदकडून आपल्या राज्यास काहीच धोका नसून यापुढे त्यांना त्रास देण्यात येऊ नये.

बळजबरी आणि दमदाटी करून काम न झाल्याने इतर मार्गाने बनुउमैयाच्या अब्दुल मलिक या शासकाने 'सईद' यांना वळविण्याचा प्रयत्न केला. परंतु 'सईद' यांच्या सत्यसंमत व न्यायसंमत भूमिकेत कोणताच बदल झाला नाही. अब्दुल मलिकने कित्येकदा त्यांची भेट घेण्याची इच्छा व्यक्त केली, परंतु सईद काही त्यास भेटले नाही. एकदा हजच्या प्रसंगी अब्दुल मलिक, मदीना शहरी आला आणि स्वत: मस्जिद-ए-नबवीच्या द्वारावर उभे राहून एका हस्तकास पाठवून 'सईद' यांना भेटण्याचे निमंत्रण पाठविले. राजहस्त सईद यांना सांगतो,

"अमीरुल मुअमिनीन (श्रद्धावंतांचे प्रमुख) दरवाजावर आपली वाट पाहात उभे आहेत."

परंतु 'सईद' अतिशय निस्पृह भावाने उत्तर देतात की,

"मला मुस्लिम शासकास भेटण्याची कोणतीच गरज नाही. माझ्याशी त्यांना एखादी गरज भासत असेलच तर ती पूर्ण होऊ शकणार नाही."

राजहस्तकाने 'सईद' यांचे उत्तर बादशाहपर्यंत जशास तसे पोहोचविले. बादशाह अब्दुल मलिकेने हस्तकास परत हा निरोप देऊन 'सईद' कडे पाठविले की, "हा आमचा आदेश आहे." सोबत असे बजावले की, भेटण्यास त्यांनी नकार दिल्यास त्यांच्यावर कोणतीच सक्ती करण्यात येऊ नये. परंतु सईद परत तेच उत्तर देतात. या वेळेस राजहस्तकास मात्र ताव आला आणि म्हणाला,

"तुम्ही विलक्षण व्यक्ती आहात. बादशाहचा सक्ती न करण्याचा आदेश नसता तर मी तुमचे शीर छाटून घेऊन गेलो असतो."

परंतु सईद त्याला अत्यंत शांतपणे उत्तर देतात,

"जा वत्सा, जा. अब्दुल मलिक माझे काही भले करू इच्छित असेल, तर ती भलाई माझ्याऐवजी तू घे आणि ते वाईट उद्देशाने बोलवित असतील तर त्यास स्पष्ट सांगून टाक की, काय करायचे ते करून घ्यावे. मी येथून हलणारसुद्धा नाही." 'सईद' यांचे उत्तर ऐकून बादशाह 'अब्दुल मलिक बिन मरवान'च्या अंगाचा तिळपापड झाला. परंतु आपला राग आवरता घेऊन तो म्हणाला, "ईश्वर 'सईद' यांच्यावर दया करो, त्यांची ताठरता वाढतच जात आहे."

आणखीन काही काळ लोटल्यानंतर बादशाह अब्दुल मलिक परत एकदा मदीना शहरी आलेला आहे. एकदा रात्री त्याचा डोळा उघडला आणि त्यास झोप येईनाशी झाली. तो आपल्या सेवकास आदेश देतो की, "जा आणि मदीना शहरात एखादा कथाकार अथवा साहित्यकार असल्यास घेऊन ये.' सेवक संपूर्ण मदीना शहर पिंजून काढतो, परंतु एवढ्या रात्री कोण भेटणार. मस्जिदमध्ये त्या सेवकास 'सईद बिन मुसैयिब दिसले. ते आपल्या पालनकर्त्या ईश्वरासमोर भक्तिभावात तल्लीन आहेत. राजसेवक त्यांना ओळखत नाही आणि इशारा करून बोलावतो. परंतु ते आपल्या जागीच शांतपणे बसून आहेत. राजसेवक म्हणाला, "मी तुम्हाला केव्हाचा बोलावित आहे आणि तुम्ही माझ्याकडे पाहातसुद्धा नाहीत?"

"काय काम आहे?" 'सईद' यांनी विचारले.

"अब्दुल मलिक राजवर्यांना झोप येत नाही. त्यांनी मला आदेश दिला की, एखादा साहित्यकार अथवा कवी घेऊन या. परंतु संपूर्ण मदीना शहरात इतक्या रात्री कोणीच मिळत नाही." राजसेवक उत्तरला.

"अब्दुल मलिकला जाऊन सांगा की, मी काही त्याचा भार नाही." 'सईद' निर्भयपणे उत्तरले. राजसेवकास वाटते की, हा एखादा वेडा माणूस असावा. त्याने पूर्ण वृत्तान्त बादशाह अब्दुल मलिक यास सांगितला. अब्दुल मलिकच्या लक्षात येते की, हा माणूस 'सईद बिन मुसैयिब'शिवाय दुसरा कोण असणार त्यामुळे राजसेवकास म्हणतो की, 'जाऊदे सोड तो विषय.'

एकदा हजच्या काळात अकस्मात बादशाह अब्दुल मलिक आणि 'सईद' यांची भेट होते. बादशाह म्हणतो, 'हे सईद ! सध्या माझी अवस्था अशी झाली की, एखादे पुण्य कार्य केल्यास आनंद होत नाही व वाईट कार्य घडल्यास वाईट वाटत नाही."

"आता तुझे अंत:करण पूर्णपणे मेले आहे." सईद शांतपणे उत्तरले.

अब्दुल मलिकनंतर त्याचा मुलगा बादशाह झाला. राजसिंहासनावर विराजमान झाल्यावर तो मदीनाभेटीस आला. मस्जिद-ए-नबवीमध्ये पाऊल ठेवताच त्याला एका माणसाभोवती लोकांचा मोठा घोळका दिसतो. त्याने विचारले, 'हे गृहस्थ कोण आहेत?" 'हे सईद बिन मुसय्यिब आहेत. त्याला उत्तर मिळते. बादशाह वलीद त्यांना बोलावणे

पाठवितो, परंतु 'सईद' म्हणतात, "माझे वलीदशी काय काम आहे? त्याने एखाद्या दुसऱ्याला बोलावले असेल कदाचित."

हा वृत्तांत ऐकून बादशाह वलीद भयंकर संतापला आणि बळजबरी आपल्यासमोर हजर करण्याचा आदेश दिला. यावर त्याचे सवंगडी सल्ला देतात,

"अमीरुल मुअमिनीन ! सईद हे मदीना शहराचे महान विधिज्ञ आणि कुरैश कबिल्यांशी त्यांचा संबंध असून ते धर्मशास्त्री आहेत. त्यांनी आपल्या पितावर्यासमोरसुद्धा मान तुकविली नाही. म्हणून आपण त्यांना बळजबरी बोलावण्याचा राजहट्ट धरू नये."

हे ऐकून बादशाह वलीद शांत बसतो. एकदा त्याने सरकारी खजिन्यातून तीस हजार दिरहम भेट म्हणून 'सईद'कडे पाठविले. परंतु त्यांनी ही भेटरक्कम परत पाठविली आणि निरोप पाठविला की,

"लोकांचे अधिकार हिरावून जमा केलेल्या संपत्तीची मला काहीही गरज नाही."

एकाने विचारले की, "तुम्हाला आपल्या जिवाचीसुद्धा भीती वाटत नाही काय?" यावर सईद उत्तर देतात,

"ईश्वर मला व्यर्थ घालविणार नाही."

मदीना शहराच्या 'मस्जिद-ए-नबवी' च्या डागडुजीची पाहणी करण्यासाठी एके दिवशी बादशाह वलीदने 'मस्जिद-ए-नबवी' रिकामी करण्याचा आदेश दिला. सईदसुद्धा मस्जिदीच्या एका कोपऱ्यात बसलेले होते. परंतु त्यांना जागेवरून उठविण्याचे धैर्य कोणास झाले नाही. एकाने हळूच शहाणपणाचा त्यांना सल्ला दिला, "आपण उठले असते तर बरे झाले असते."

"माझ्या उठण्याची वेळ होण्यापूर्वी मी येथून उठणार नाही." 'सईद' उत्तरले.

"अमीरुल मुअमिनीन' (बादशाह वलीद) चा येथून गुजर झाल्यास त्यांना उभे राहून सलाम करावा." एकाने म्हटले, "ईश्वरशपथ मी त्याच्या मानास्तव उभा राहणार नाही." सईद उत्तरले.

'उमर बिन अब्दुल अज़ीज़' हे मदीना शहराचे राज्यपाल झाले. ते 'सईद बिन मुसैयिब' यांची न्यायनिष्ठा आणि विद्वत्तेने चांगलेच परिचित होते. त्यांनी वलीद बादशाहास मस्जिदीची पाहणीस्तव 'सईद' यांचे ठिकाण सोडून इतर ठिकाणी घेऊन फिरले. परंतु बादशाह वलीदची नजर जेव्हा 'सईद' यांच्यावर पडते तेव्हा तो स्वतःच म्हणतो, "मला वाटते की हे 'सईद' आहेत."

"होय, ते खूप वृद्ध आहेत," राज्यपाल उमरबिन अब्दुल अज़ीज़ म्हणाले. "त्यांना डोळ्यांनीसुद्धा कमी दिसते. तुम्हाला ओळखले असते तर कदाचित सलाम केला असता."

"होय मला त्यांची परिस्थिती माहीत आहे." बादशाह वलीद म्हणाला. मग 'सईद'कडे वळून म्हणाला, "गुरुवर्य, आपली प्रकृती कशी आहे?"

"ईश्वरकृपेने बरी आहे." सईद बसल्या बसल्या शांतपणे उत्तर देतात. बादशाह वलीद जाता जाता स्वत:लाच म्हणतो, "ही जुन्या काळाची आठवण आहे."

त्या शासनकाळातील एक राज्यपाल 'हिज्जाज बिन यूसुफ' चे अत्याचारी कृत्य बरेच कुप्रसिद्ध आहेत. त्याच्या जुलमी अत्याचारांना जगाचा प्रत्येक जण ओळखतो. एके दिवशी तो लवकर लवकर लगबगीने नमाज अटोपून घेत होता. 'सईद' यांनी अशा अवस्थेत त्यास पाहिले आणि मुठीत खडे घेऊन त्याच्यावर भिरकावले. हिज्जाजने आपली चूक ओळखून घेतली आणि व्यवस्थीतपणे नमाज पढू लागला. नमाज आटोपताच काय होणार याची कल्पना न केलेलीच बरी (अर्थात खडे मारण्याच्या अपराधास्तव सईद यांचा देहवध निश्चित !) परंतु हिज्जाज बिन यूसुफ संयमाने वागला. वस्तुत: हिज्जाजच्या हातून मोठमोठ्या ईशपरायण आणि सदाचारी लोकांचा शीरच्छेद घडला होता. परंतु 'सईद' समोर त्याचे धैर्य सुटले. तो स्वत:च म्हणत असे की, 'सईद' यांनी (खडे मारून) माझ्या नमाज पद्धतीत सुधारणा घडविली.'

(३)

'सईद' हे बऱ्याच पात्रतांचे मूर्त स्वरुप होते. ज्ञानाप्रमाणेच ते ईशपरायणता, चांगुलपणा व सदाचार आणि न्यायनिष्ठा, परखड व्यक्तिमत्त्व आणि सडेतोड भूमिकांचे जिवंत उदाहरण होते. त्यांनी कधीच सामुदायिक नमाज सोडली नाही. 'मस्जिद-ए-नबवी' हे जणू त्यांचे दुसऱ्या क्रमांकाचे निवासच होते. तासन्तास ते प्रबोधनात्मक प्रवचने देऊन लोकांना सतकार्यांकडे वळवीत असत आणि बहुतेक वेळ इस्लामी विधीच्या अभ्यास व संशोधनात समर्पित करीत असत. मदीनावासीयांवर महान संकट अशा प्रसंगी कोसळले जेव्हा त्यांनी 'यज़ीद' या बनूउमय्या परिवाराच्या बादशाहीस ठोकरून प्रेषित मुहम्मद (स) यांचे सोबती असलेल्या अब्दुल्लाह बिन जुबैर (र) यांच्या इस्लामी नियमांवर आधारित शासनाचा स्वीकार केला. यज़ीदच्या जुलमी सत्तेविरोधी बंडाच्या चळवळीचा झेंडा त्या वेळी माननीय अब्दुल्लाह बिन हन्ज़ला (र) यांच्या हाती होता. हे बंड ठेचून काढण्यासाठी यज़ीद बादशाहचे लष्कर सलग तीन दिवस मदीना शहरात आग व रक्ताची होळी खेळत होते. एकाही परिवारास त्यांनी सुरक्षित सोडले नाही. कित्येक लोकांना आपले प्राण गमवावा लागले. कित्येक मुले अनाथ झाली. कित्येक स्त्रियांशी अमानवी खेळ खेळण्यात आला. राहत्या घरांना आगी लावण्यात आल्या. कित्येक लोक या अत्याचाराला भिऊन मातृभूमी त्यागून पळून गेले. कोणातही 'यज़ीद' विरुद्ध 'ब्र' काढण्याचेही धैर्य नव्हते. संपूर्ण शहराचे स्मशानात रुपांतर झाले. मस्जिदींमध्ये कोणीही नमाज़ पढ़णारा व अज़ान देणारा बाकी राहिला नाही. परंतु अशा संकटग्रस्त परिस्थितीमध्ये सुद्धा 'सईद' डगमगले नाही. यज़ीदी शासनाचे लोक त्यांना वेडा माणूस म्हणवून हिणवत असत.

अशा काळात 'सईद' रात्रंदिवस आपल्या पालनकर्त्या ईश्वरासमोर मान तुकवित आणि

अश्रू ढाळीत असत. स्वत:स संबोधून म्हणत की, ‘‘हे पापाच्या स्त्रोता ! उठ !! मी तुला अशा उंटाप्रमाणे जखमी आणि दुर्दशाग्रस्त करून सोडीन की, जो तहानेने व्याकूळ होऊन पडत्या पावलाने वाळवंटात फिरत राहतो.’’ असे म्हणून मध्यरात्रीच्या नमाजीसाठी उभे राहत आणि सकाळपर्यंत ईशप्रार्थनेत मग्न राहत असत. दिवसा उपवास धरीत असत. प्रवास असो की मुक्काम, प्रत्येक वेळेस दिव्य कुरआनचा अभ्यास करीत असत. सवयी आणि कर्मकार्यात आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांचे ते उदाहरण होते. त्यांना पाहून अब्दुल्लाह बिन उमर (र) म्हणत असत की,

‘आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांना पाहून खूप आनंदीत झाले असते.’ ते अतिशय दयाळू आणि मृदु स्वभावाचे होते. कलह व भांडणे त्यांना मुळीच आवडत नसत. अन्यायाचे कोणत्याही परिस्थितीत समर्थन करीत नसत. म्हणूनच प्रत्येक बादशाहने त्यांच्यावर अत्याचार केले. इस्लामी विधीवर काटेकोरपणे ते आचरण करीत असत. तसेच कोणाच्याही अपराधावर ते पडदा टाकीत नसत. ‘इब्ने हरमला’ कथन करतात की, ‘एके दिवशी मी सकाळी सकाळी घराबाहेर पडलो. एका माणसास मी दारुच्या नशेत पाहिले. त्यास बळजबरी धरून घरी घेऊन गेलो व ‘सईद बिन मुसैयिब’ यांना विचारले, ‘‘मी यास दारू पिण्याच्या पापाची शिक्षा देण्यासाठी राज्यपालाकडे घेऊन जाऊ का?’’ यावर ‘सईद’ उत्तरले की, ‘‘तुम्ही आपले कपडे लपवू शकत असाल तर लपवा.’’ त्यांचे उत्तर ऐकून मी घरी आलो. तोपर्यंत तो दारूड्या मला पाहून आपल्या पापावर लज्जित झालेला दिसत होता. ‘‘तुला लाज वाटत नाही काय? सकाळी सकाळी दारुच्या नशेत पकडला गेला असता, तर न्यायाधीशाने फटके लगावले असते. मुस्लिमांच्या नजरेत अब्रू गेली असती. तुझी साक्ष स्वीकार झाली नसती. तुझ्या शब्दाना किंमत राहिली नसती.’’

मी त्याला खडसावले माझे बोलणे ऐकून झाल्यावर तो म्हणाला, ‘‘ईश्वरा शपथ ! या पुढे मी हे पाप कधीच करणार नाही’’ आणि मला तो नंतर कधीच दारूच्या नशेत दिसला नाही.

‘सईद बिन मुसैयिब’ अतिशय त्यागी, कनवाळू व प्रेमळ स्वभावाचे होते. धन, संपत्ती आणि सत्तेची त्यांच्या दृष्टीत कवडीचीही किंमत नव्हती. धर्म, श्रद्धा आणि नैतिकतेवर चालणाऱ्यासच ते किंमत व प्रतिष्ठा देत असत. ‘सईद बिन मुसैयिब’ यांना एक अत्यंत सुंदर व सुशील कन्या होती, ती अतिशय शिकली सवरलेली आणि हुशार व शीलवान होती. अब्दुल मलिक बादशाहने आपल्या राजकुमारासाठी सईद यांना मुलीच्या विवाहाचा प्रस्ताव ठेवला होता. (पुढे चालून हाच राजकुमार आपल्या पित्याच्या सिंहासनावर आरूढ झाला.) ‘सईद’ यांनी त्याचा हा प्रस्ताव फेटाळला. अब्दुल मलिकने या प्रस्तावासाठी साम, दाम, दंड व भेदाचे सर्व प्रकार आजमावले. परंतु सईद बिन मुसैयिब पर्वतासारखे आपल्या निर्णयावर ठाम राहिले आणि ‘अब्दुल्लाह बिन विदाआ’ या गरीब आणि सद्वर्तनी तरुणाशी त्यांनी आपल्या मुलीचा अगदी साध्या पद्धतीने आणि इस्लामी नियमानुसार विवाह केला. सईद यांचे जावई अब्दुल्लाह

बिन विदाआ हे नेहमी 'सईद' यांच्या प्रवचनात नित्यनेमाने हजर राहात असत. परंतु अचानक त्यांची बऱ्याच दिवसांपासूनची गैरहजेरी पाहून त्यांना दु:ख झाले. एक दिवस मग ते प्रवचनात हजर झाले, तेव्हा 'सईद' यांनी विचारले, "एवढे दिवस कोठे होता?" "माझ्या पत्नीचा स्वर्गवास झाला." ते उत्तरले. "मला याची खबर का दिली नाही?" 'सईद' यांनी विचारणा केली व म्हणाले, "अब्दुल्लाह ! तुम्ही तरुण आहात. दुसरे लग्न करा."

"मी गरीब माणूस आहे. मला कोण मुलगी देईल."

"अब्दुल्लाह ! मी देईन तुम्हाला दुसरी मुलगी." सईद शांतपणे उत्तरले.

अब्दुल्लाह कोणतेही उत्तर न देता शांत राहिले.

"अब्दुल्लाह ! तुम्ही गप्प का आहात?" सईद यांनी त्यांचे मौन बघून विचारले.

"आपले हे महान उपकार पाहून गुरुवर्य !" अब्दुल्लाह कृतज्ञभावनेने उत्तरले.

"उठा ! कुरैश कबिल्याच्या काही लोकांना लग्नाचे निमंत्रण द्या." 'सईद' यांनी त्यांना प्रेमपूर्वक सांगितले. अब्दुल्लाह यांनी त्यांच्या आदेशपालनात त्यांच्या दुसऱ्या कन्येशी विवाह केला आणि त्याच दिवशी संध्याकाळी स्वत: सईद आपल्या मुलीस 'अब्दुल्लाह'च्या घरी सोडून आले.

## (४)

सईद बिन मुसैयिब हे खूप कर्मठ, विरक्त आणि धर्मनिष्ठ असले, तरी सन्यासवादी मुळीच नव्हते. तसेच इहवादीसुद्धा नव्हते. ते नेहमीच भक्ती, व्यवहार आणि नीतिमत्ता व आचरणात इस्लामी विधीचे काटेकोरपणे पालन करीत असत. एकदा त्यांचा गुलाम 'बुर्द' याने काही लोकांच्या बाबतीत म्हटले, "यांपैकी एकजण असा आहे की, तो जुहर (दुपार) ची नमाज पढ़ल्यानंतर असर (तिसरे प्रहर) च्या नमाजपर्यंत नफ़िल (ऐच्छिक) नमाजमध्ये मश्गूल असतो." हे ऐकून सईद म्हणाले,

"हे बुर्द ! ही उपासना व भक्ती मुळीच नव्हे. ईश्वराची उपासना ही आहे की, माणसाने ईश्वराने निषिद्ध ठरविलेल्या कर्मांपासून दूर राहावे, तसेच ईश्वरीय आदेशांवर व कर्मसंहितेवर गंभीरपणे विचार करून त्याचे पालन करावे आणि ईश्वराची उपासना त्याच्या वैध उपजीविका कमावण्यात अड़सर बनू नये."

सईद बिन मुसैयिब हे ज़ैतुन (ऑलिव्ह) चे तेल विक्री करून आपली उपजीविका मिळवीत असत.

सईद यांचे प्रवचन प्रबोधनात्मक असे. ते नेहमी म्हणत की, "अत्याचार करणाऱ्यांचा नेहमी द्वेष करा. अन्यथा तुमचे पुण्यकर्मे नष्ट होण्याची भीती आहे.

प्रकरण दुसरे

## सईद बिन जुबैर (र)

### (१)

जीवन सत्यास अर्पण केल्याने आणि ईश्वराच्या इच्छेवर प्रसन्नतापूर्वक राजी व्हावे. मृत्यू तर केवळ विस्मयकारक धोका आहे. सत्याचा पुजारी हा सिंह असून मृत्यू एक हरीण आहे. मृत्यू माणसाच्या शेकडो पर्वांपैकी एक पर्व आहे. तो शूरवीर मृत्यूवर असा झेपावतो, जसा सिंह आपल्या भक्ष्यावर झेपावतो. मृत्यूला घाबरणारा मृत्यूच्या भीतीने दररोज मरत असतो. मृत्यूचे भय त्यास इतके प्रभावित करते की, त्याचे जगणे अवघड होऊन जाते. परंतु ईश्वराच्या दासांची शान काही विलक्षण आहे. मृत्यू त्यास एक नवीन जीवन प्रदान करतो.

'कूफ़ा' या राजधानी असलेल्या शहरातील राजप्रसाद उमैया परिवाराचा निर्दयी व जुलमी राज्यपाल 'हिज्जाज बिन यूसुफ' आपल्या विशेष कक्षात थाटात बसलेला आहे. तो कक्षाच्या दरवाजास टक लावून बसलेला आहे, जणू तो कोणाची तरी वाट पाहत आहे. इतक्यात सशस्त्र पहारेकऱ्यांबरोबर एक वयोवृद्ध कक्षात दाखल होतात. रंग काळा आणि डोक्यावरील केस आणि दाढी पांढरी शुभ्र. राज्यपाल हिज्जाज त्यांच्यावर प्रक्षुब्ध नजर टाकून डरकाळतो,

"तुमचे नाव काय आहे?"

"सईद बिन जुबैर"

"नव्हे ! शक़ी बिन कसीर आहात तुम्ही, तो" कड़ाड़तो.

"माझ्या मातेस तुमच्यापेक्षा जास्त ठाऊक आहे की मी कोण आहे?" सईद अगदी शांतपणे उत्तर देतात.

"तुमची माता देखील दळभद्री व तुम्हीही दळभद्री." हिज्जाज दात चावून म्हणाला.

"अदृष्याचे ज्ञान केवळ ईश्वरालाच आहे." पूर्वीप्रमाणेच शांतपणे सईद उत्तर देतात.

"मी तुम्हास भडकणाऱ्या भयानक आगीच्या स्वाधीन करीन." हिज्जाज धमकी स्वरूपात गरजतो.

"मला विश्वास आहे की ही गोष्ट तुमच्या सामर्थ्याबाहेर आहे. अन्यथा मी तुम्हास 'ईश्वर' मानले असते." सईद शांतपणे त्याच्या फिरऔनपणावर वार करतात. (अर्थात त्यांच्या अहंकार आणि गर्वावर वार करतात.)

"मुहम्मद (स) यांच्या बाबतीत तुमचे काय मत आहे?" आपल्या निश्चित केलेल्या निर्णयास निमित्त देण्यास्तव हिज्जाज मुद्दाम विषयांतर करतो.

"आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांच्या बाबतीत विचारता काय?" सईद विचारतात.

"हूं !" होकारार्थी डोके हलवून हिज्जाज उत्तरतो.

"ते आदम (अ) यांच्या संततीचे सरदार आणि संपूर्ण मानवजातीचे मार्गदर्शक होते !" सईद यांच्या शब्दांतून आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांच्याविषयी असलेल्या श्रद्धा व प्रेमाचे झरे वाहत होते. हे शब्द त्यांच्या अंत:करणातून निघत होते.

"अबू बकर (र) यांच्या बाबतीत ?" हिज्जाजचा दुसरा प्रश्न.

"ते आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांचे स्नेही, सखे, सोबती होते. त्यांचे संपूर्ण जीवन भाग्यशाली होते आणि मृत्यू हा मानवजातीच्या मुखावरील प्रशंसाची फुले होता. त्यांनी आदरणीय प्रेषितांच्या मार्गदर्शनावर आजीवन वाटचाल केली. कधीही प्रेषितांचा मार्ग सोडला नाही." सईद यांचे शब्द श्रद्धेने ओतप्रोत भरलेले होते.

"उमर (र) यांच्या बाबतीत?" हिज्जाज चा परत तिसरा प्रश्न.

"उमर फारुक़ (र) हे सत्य आणि असत्यात फरक करणारे होते. ईश्वराचे लाडके दास आणि आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांचे स्नेही व मित्र होते. प्रेषित मुंहम्मद (स) आणि अबू बकर (र) यांच्या मार्गावर जगले आणि त्या मार्गदर्शनपर विधीत थोडाही बदल खपवून घेतला नाही." सईद यांच्या शब्दांतील श्रद्धा आणखीनच दृढ होत आहे.

"उस्मान (र) यांच्या बाबतीत काय मत आहे ?"

"ते अर्थशील, हुतात्मे, संयमाचा बोध देणारे, महान दानशूर, स्वर्गात आपले निवास तयार करणारे, आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांचे जावई आणि सोबती." सईद उत्तर देतात व त्यांचा एक एक शब्द श्रद्धासागरातून ओथंबून वाहत होता.

"आणि अली (र) यांच्या बाबतीत?" हिज्जाज परत प्रश्न करतो.

"ते आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांचे चुलत भाऊ, किशोरवयातच इस्लाम स्वीकारणारे, प्रेषित कन्या फातिमा (र) यांचे पती, हसन (र) आणि हुसैन यांचे पितावर्य." सईद यांचा आवाज वाढतो.

"अब्दुल मलिकच्या बाबतीत काय मत आहे?" हिज्जाजचा पुढचा प्रश्न.

"तुम्ही अशा माणसाच्या बाबतीत विचारता की ज्याच्या पापांपैकी एक पाप हे तुमचे अस्तित्व आहे." सईद सडेतोडपणे आणि निर्भयपणे उत्तर देतात.

"आणि माझ्या बाबतीत ?" हिज्जाज अंतिम प्रश्न विचारतो.

''तुम्ही स्वत:ला स्वत:च चांगले ओळखता.''

एकार्थाने सईद त्यास आत्मपरीक्षणाची सुचना देतात.

''तरीदेखील?'' आत्मपरीक्षण करण्याऐवजी हिज्जाज परत प्रश्न करतो.

''तुम्हाला राग येईल.'' सईद त्याच्या मानसिक दुर्बलतेवर बोट ठेवतात.

''तरीही सांगा,'' हिज्जाज आग्रह करतो.

''क्षमस्व'' सईद परत तेच उत्तर देतात.

''जर मी तुम्हास क्षमा केली, तर ईश्वर मला क्षमा करणार नाही.'' हिज्जाबाचा संताप अनावर होतो.

''मला माहीत आहे की, ईश्वरीय आज्ञांचे उल्लंघन करणे हीच तुमच्या जीवनाची पद्धत झाली आहे. आपल्या अवैध इच्छांच्या पूर्तीस्तव तुम्ही असे कृत्य करता की, ज्यामुळे तुमचा वचक आणि दबदबा निर्माण व्हावा आणि हीच गोष्ट तुम्हाला नष्ट करील.'' सईद शांतपणे उत्तरले,

''सईद ! तुमचे फार वाईट वाटते'' हिज्जाज दात खाऊन बोलतो.

''वाईट या गोष्टीचे वाटायला पाहिजे की, ज्यास स्वर्गप्राप्तीपासून वंचित करून नरकाग्नीत ढकलण्यात आले.'' सईद मोठ्या कौशल्याने यश, अपयश आणि आनंद व दु:खाची इस्लामी परिभाषा त्यास सांगतात.

हिज्जाज आदेश देतो की, यांच्यासमोर संपत्तीचा ढीग लावण्यात यावा. आदेशाचे तत्काळ पालन करण्यात येते. परंतु सईद म्हणतात, ''जर तुम्ही ही धनसंपत्ती यासाठी जमा करून ठेवली की, ती दान करून अंतिम निवाड्याच्या दिवशी मोक्ष प्राप्त होईल तर ठीक, अन्यथा तो इतका भयानक दिवस असेल, की दूध पाजणाऱ्या मुलाससुद्धा माता सोडून देईल. ऐहिक सुखासाठी लोकांवर अत्याचार करून मिळविलेली संपत्ती दानधर्म केली तरी मोक्ष प्राप्त होणार नाही.''

''तुम्ही कधी हसत का नाही?''

''अशा माणसास हसू कसे येईल की ज्याची निर्मिती मातीपासून झाली आहे आणि माती ही आगीचे भक्षण आहे.''

सईद यांच्या बोलण्याचा अर्थ असा होता की, दारिद्र्याची जाणीव ठेवणारे लोक परलोकी मोक्षापासून गाफील राहत नाहीत.

''मग आम्हाला कसे हसू येते?'' हिज्जाजने विचारले.

"सगळेजण एकसारखे नसतात." सईद उत्तर देतात.

"तुम्ही कधी मनोरंजनाचे साहित्य पाहिले काय?" असे सांगून हिज्जाज बासरी वाजविण्याचा आदेश देतो. बासरीवादन ऐकून 'सईद' यांना रडू कोसळते. हे पाहून हिज्जाज विचारतो,

"रडण्याचे काय कारण आहे ? ही मनोरंजनाची साधने आहेत."

"ही मनोरंजनाची साधने नसून शोकवाद्ये आहेत. या बासरीच्या सुरावरून महाप्रलयाप्रसंगी फुंकण्यात येणाऱ्या सूराची आठवण झाली. बासरी एका अशा वृक्षापासून तयार झालेली आहे, जे नाहक कापण्यात आले." सईद म्हणतात.

"मी तुमची अशा क्रूरतेने हत्या करीन की आजपर्यंत कोणाची तशी मी हत्या केली नसेल आणि यापुढेही कोणाची होणार नाही." हिज्जाज क्रोधित होत होता.

"तुम्ही माझे केवळ ऐहिक नुकसान करू शकाल, परंतु मी तुमचे परलोकीय जीवन उद्ध्वस्त करीन." सईद यांनी त्याच्या पापाची जाणीव करून देताना म्हणतात.

"सईद ! तुम्हाला कशा प्रकारचा मृत्यू हवा?"

"हिज्जाज ! परलोकात स्वत:करिता जशी शिक्षा पाहिजे असेल तशीच द्यावी." सईद उत्तरले.

"मी तुम्हास माफ करावे असे तुम्हाला वाटते काय?"

"तुम्ही माफ कराल तर ही माफी ईश्वराकडूनच असणार तुमचे मुळीच उपकार नसेल." सईद निस्पृहतेने उत्तर देतात.

"याला घेऊन जा आणि शीरच्छेद करा !" हिज्जाज कडाडून आदेश देतो. सईद दारातून जाताना हसत असतात. हिज्जाजला हे माहीत होते. तो क्रोधाने त्यांना परत बोलावतो आणि विचारतो, "हसण्याचे कारण ?"

"ईश्वराच्या तुलनेत तुमची हिंमत आणि तुमच्या तुलनेत ईश्वराचा आदेश पाहून आश्चर्य वाटले." सईद कारण देतात. हिज्जाज त्यांच्या हत्येचा आदेश देतो," यांची हत्या करा !" सईद किबल्याकडे (पश्चिम दिशेकडे) वळून मंत्रोच्चार करतात,

'मी निश्चिंत होऊन आपला चेहरा प्रत्येक थोतांड उपास्याला झुगारून एकाच वास्तविक अल्लाहकडे वळलो."

हिज्जाज क्रोधित होऊन ओरडतो, "याचा चेहरा किबल्याकडून वळवा !"

सईद म्हणतात,

'तुम्ही जिकडे वळाल तिकडे (सर्व ठिकाणी) ईश्वर आहे."

हिज्जाज क्रोधाने दरडावून आदेश देतो,

"यास जमिनीवर पालथा टाका."

सईद म्हणतात,

"ईश्वराने म्हटले की, याच मातीतून मी तुम्हास निर्मित केले आणि यातच तुम्हाला जावे लागणार आणि मग यातूनच परत तुम्हास जिवंत करून उभे केले जाईल."

"याचा लवकर शीरच्छेद करा !" हिज्जाज मोठ्याने ओरडतो. सईद धर्मसूत्र उच्चारतात आणि म्हणतात, "हिज्जाज अंतिम निवाड्याच्या दिवशी भेट होईल!" मग ईश्वराशी प्रार्थना करतात, 'हे ईश्वरा! माझ्या हत्येनंतर इतर कोणाचीही हत्या करण्याचे याला सामर्थ्य देऊ नकोस !"

आणि मग त्यांचे शीर त्यांच्या शरीरापासून विभक्त करण्यात येते.

(२)

हे सईद बिन जुबैर (र) होते. (जन्म ३८ आणि मृत्यू ९४ हिजरी सन) यांना कोण ओळखत नाही! हे इस्लामी इतिहासातील त्या महान व्यक्तींपैकी एक होते जे ज्ञान व संशोधनाच्या आकाशी तेजस्वी सूर्याप्रमाणे तळपत होते. त्यांचा चांगुलपणा आणि आचरणपावित्र्य श्रद्धावंतासाठी आदर्श होते. सत्योपासना हीच त्यांची ओळख होती. निर्भीड सत्यवचन त्यांच्या जीवनगाथेचा प्रखर व तेजोमय विषय होता. हाच प्रखर विषय एका अन्यायी मुस्लिम बादशाहच्या निर्दयी तलवारीस बळी पडून मुस्लिम समुदायाच्या इतिहासास सुशोभित करतो. काय अपराध होता सईद यांचा? त्यांचा अपराध केवळ हाच होता की, जुलमी बादशाहच्या धमक्यांना भीक न घालता त्यांनी अन्यायाविरुद्ध आवाज उठवून ईश्वरीय आदेशाचे पालन केले होते. हे अन्यायी शासक दुर्बलांचे रक्त सांडत, त्यांच्यावर नाना प्रकारचे भयानक अत्याचार करीत आणि त्यांच्या अन्याय व अत्याचाराविरुद्ध पेटून उठलेल्या ईशभक्तांना देशद्रोही, राष्ट्रद्रोही आणि उपद्रवी घोषित करून त्यांचा निर्दयी वध करीत. सईद हे देखील अशाच ईशभक्तांपैकी एक होते.

सईद बिन जुबैर (र) हे 'हदीसशास्त्राचे' महान संशोधक होते. त्यांनी प्रेषितसोबत्यांच्या समुदायाकडून प्रेषितवचने गोळा केली असून या प्रेषितसोबत्यांत 'अली (र), अब्दुल्ला बिन अब्बास (र), अब्दुल्लाह बिन जुबैर (र) आणि अबू हुरैरा (र) यांच्यासारखे प्रेषितवचन (हजीस) शास्त्राचे शिक्षकवृंद आहेत.

ते प्रगल्भ विधिज्ञ होते. मोठमोठे विद्वान आपल्या अडचणीत त्यांचे मार्गदर्शन घेत. कूफ़ावासी आपल्या धार्मिक अडचणी जेव्हा अब्दुल्लाह बिन अब्बास यांच्याकडे घेऊन येत, तेव्हा ते त्यांना सईद यांच्याकडे पाठवीत असत. इमाम अहमद बिन हम्बल (र) म्हणतात की, ''हिज्जाने एका अशा माणसाचा वध केला ज्याच्या विद्यामार्गदर्शनाची गरज प्रत्येकास होती.'' 'हनीफ (र)' यांचे कथन आहे की, प्रेषितसोबत्यांच्या शिष्यांमध्ये सईद बिन मुसैयिब (र) हे तलाक़च्या विधीचे जाणकार होते, 'अता (र)' हे 'हज' च्या विधीचे जाणकार, 'ताऊस (र)' हे वैध आणि अवैध शास्त्राचे विद्वान, मुजाहिद (र) दिव्य कुरआनाचे विद्वान तर सईद बिन जुबैर (र) हे इस्लामच्या सर्वच ज्ञानांचे विद्वान होते.

ईशपरायणतेची अवस्था अशी होती की, जो कोणी त्यांच्याकडे येत असे त्यास ते ईशस्मरणाची शिकवण अवश्य देत असत. 'हिलाल बिन खब्बाब (र)' म्हणतात की, आम्ही एके दिवशी एका अंतयात्रेत होतो. कब्रस्तानात पोहोचल्यावर तेथे धर्मप्रवचनास सुरुवात झाली. तेव्हा सईद बिन जुबैर (र) म्हणाले की, 'मृत्यूस्मरणाने गाफील झालो तर माझे सर्व काही वाया जाण्याची भीती वाटते.' एकदा त्यांना विचारले गेले की, 'तुमच्या दृष्टीत सर्वांत मोठा ईशभक्त कोण आहे?' सईद उत्तरले की, 'माझ्या दृष्टीत सर्वांत मोठा ईशभक्त तो माणूस आहे की, ज्याचे पूर्ण जीवन पापात बरबटले होते. परंतु नंतर आपल्या पापांवर पश्चात्ताप करून सद्वर्तनी जीवनाची त्याने सुरुवात केली. परंतु ज्या ज्या प्रसंगी त्यास आपल्या पापी जीवानाची आठवण आली, त्यास आपले पुण्य कार्य पापांच्या तुलनेत तुच्छ वाटावे. माणसाची ईशपरायणता मानवास पापकर्मांपासून दूर ठेवते आणि ईशपरायणता हे ईशस्मरण आणि ईश्वरीय आदेशपालनाचेच नाव आहे. अर्थात ईश्वरीय आदेशाचे पालन करणे, हेच खरे ईशस्मरण होय. तसेच ज्याने ईश्वरीय आदेशाचे उल्लंघन केले त्याने ईश्वराचे स्मरण केलेच नाही. ईश्वराचे स्मरण म्हणजे केवळ रात्रंदिवस त्याचे नामजप करणे वा रात्रंदिवस कुरआनाचे पठन करणे मुळीच नव्हे.

सईद हे ईश्वराशी नेहमी प्रार्थना करीत असत की, 'हे ईश्वरा! मी तुझ्या दरबारी सरळमार्गी, प्रामाणिक जीवनाची मागणी करतो. केवळ तुझ्यावरच विश्वास ठेवून जगण्याची सद्बुद्धी दे. तुझ्याकडून मोक्षाची आशा करतो.'

ईश्वराने त्यांना दिव्य कुरआनचे संशोधनात्मक बुद्धीने अभ्यास करण्याचे सामर्थ्य प्रदान केले होते. दिव्य कुरआनचा अभ्यासपूर्ण अर्थ सांगण्यात ते तरबेज होते. एकदा त्यांनी दिव्य कुरआनाची एक आयत पठन केली, आणि म्हणाले, या आयतीचा अर्थ असा आहे की, लोक पाप करतात आणि म्हणतात की, ईश्वरासमोर माफी मागू व आम्हाला मोक्ष प्राप्त होईल. ईश्वराचा दिव्य कुरआनात आदेश आहे की,

'जर एखाद्या भूप्रदेशावर खूप पाप, अपराध आणि अन्याय होत असतील, तर ती भूमी त्याग करावी. तेथून दुसरीकडे स्थलांतर करावे.

'अबू यूनुस जहनी' कथन करतात की, 'मी एकदा सईद बिन जुबैर यांच्यासमोर कुरआनाची ही आयत पठन केली, ''परंतु दुर्बल पुरुषांपैकी, स्त्रिया व मुलांपैकी,'' यावर सईद बिन जुबैर अर्थ स्पष्ट करताना म्हणाले, ''यामध्ये ज्या लोकांचा उल्लेख आहे ते मक्का शहरातील केवळ काही अत्याचारपीडित लोक होते.'

मी म्हणालो, ''मी देखील अशाच काही (मदीना शहरातील) अत्याचारपीडितांना पाहून येत आहे.''

सईद म्हणाले, ''पुतण्या ! आम्ही लोकांनी अत्याचाराविरुद्ध खूप प्रयत्न केले आहेत. परंतु काय करावे, कदाचित ईश्वराची हीच मर्जी असावी.''

सईद बिन जुबैर यांची काही कथने आजही खूप मार्गदर्शक ठरतात. एकदा एकाने विचारले की,

''तुम्ही ज्या वेळी 'अस्फ़हान' या शहरात होता, तेव्हा 'प्रेषितवचने' सांगत नसत. परंतु 'कुफ़ा' शहरी वास्तव्यास आल्यावर आपली कार्यप्रणाली पार बदलून गेली?''

सईद म्हणाले, ''आपली ज्ञानसंपत्ती तिचे मोल जाणणाऱ्यांसमोर सादर करावी.'' एकदा सांगू लागले, ''मी इतका दुर्बल झालो की, एखाद्यास अपराध करताना पाहिल्यास त्याला रोखण्याची मला लाज वाटते !''

सईदसमोर कोणी एखाद्याची निंदा केल्यास ते म्हणत, ''जे काही सांगावयाचे आहे, ते त्याच्या तोंडावर सांगा !'' 'हिलाल बिन खबाब' यांनी एकदा त्यांना विचारले, ''लोक कोणत्या पापांमुळे नष्ट होतील?'' सईद म्हणाले की, ''लोभी, स्वार्थी व इस्लामचा असत्यासाठी वापर करणाऱ्या विद्वानांमुळे !'' एकदा म्हणाले, ''ईशप्रार्थनेतील गोडवा आणि रूची हे प्रार्थना स्वीकृतीचे लक्षण आहे !''

हे होते ते प्रामाणिक हदीसचे कथनकार, विद्वान, विधिज्ञ, ईशपरायण आणि संशोधक दृष्टी असलेले 'सईद बिन जुबैर', ज्यांच्यावर जुलमी राज्यपाल 'हिज्जाज बिन यूसुफ़' याने अन्यायाविरुद्ध लढण्याच्या अपराधास्तव कठोर शिक्षा दिली. ज्यांच्या प्रतापी रक्ताने आपली जुलमी तलवार रंगविली. वस्तुस्थिती ही आहे की, त्यांचा हाच श्रेष्ठ दर्जा व उच्चवर्तन त्यांच्या हौतात्म्याचे कारण बनले. प्राणाचे बलिदान देऊनच त्यांनी आपले श्रेष्ठत्व सिद्ध केले.

ते नेहमीच ईश्वरदरबारी प्रार्थना करीत असत की, हे ईश्वरा ! अन्याय व अत्याचाराविरुद्ध लढताना मला वीरमरण देऊन माझ्या प्राणाचे बलिदान स्वीकार कर!" मक्का शहरातील वास्तव्यकाळातही ते तेथील राज्यपाल असलेल्या 'खालिद बिन अब्दुल्लाह'च्या कैदेत जीवन कंठीत होते. 'हिज्जाज'चे शिपाई त्यांना घेऊन जाण्याकरिता ज्या वेळी आले, त्यांना पाहून ते म्हणाले, "माझ्या प्राणाच्या बलिदानाची वेळ येऊन ठेपली आहे. मी आणि माझ्या काही मित्रांनी एकदा ईशदरबारी प्रार्थना केली होती की, आम्हास हौतात्म्य प्रदान कर ! माझे दोन्ही मित्र हुतात्मे होऊन ईश्वराकडे पोहोचले. मीसुद्धा याच क्षणाची आतुरतेने वाट पाहत होतो."

हिज्जाजचे शिपाई त्यांना मक्का शहारातून घेऊन जात असताना वाटेत विलक्षण अनुभूती आल्या. शिपाई त्यांना म्हणत होते, "हे प्रामाणिक आणि निर्मल अंत:करणाच्या शूर पुरुषा ! आम्हास जर आपल्या ईशपरायणतेची स्थिती माहीत नसती आणि आम्हास हे काम सोपविले गेले नसते, तर किती चांगले झाले असते. हे आमचे केवढे मोठे दुर्भाग्य आहे. आमच्यावर खूप कठीण परीक्षणाची व अरिष्टतेची ही वेळ आहे. अंतिम निवाड्याच्या दिवशी आमच्यातर्फे तुम्हीच ईश्वराची माफी मिळवून द्यावी. कारण ईश्वरच महान न्यायदाता आहे. तो कोणावरही अन्याय होऊ देत नाही."

सईद म्हणाले, "मी तुम्हा सर्वांना क्षमा करीत आहे. माझी तुमच्यावर कोणतीच नाराजी नाही. मी तर ईश्वराकडून होत असलेल्या प्रत्येक घटनेवर राजी आहे."

वधस्थानी जाण्यापूर्वी आपल्या पुत्रास बोलावले. त्यांच्या पुत्राचे अश्रू अनावर झाले. मुलाचे सांत्वन करताना सईद म्हणाले,

"बेटा ! कशापायी रडतोस ? तुझ्या पित्याने जीवनाची ५७ वर्षे पाहिली आहेत. आणखीन जीवित राहण्याची काय गरज आहे ?"

'सईद' यांची हत्या म्हणजे एका महामानव आणि असामान्य धर्मपंडिताची हत्या होय. हिज्जाज बिन यूसुफ या जुलमी राज्यपालाने सव्वा लाख मुस्लिमांचा नाहक बळी घेतला.

कित्येक विद्वान, विधिज्ञ व धर्मप्रसारक, समाजसुधारक सुळावर चढविण्यात तर आलेच, शिवाय त्याच्या जुलमी तलवारीने मुस्लिम जनसमूहाच्या शरीरावर जो घाव घातला त्यामुळे संपूर्ण जनसमुदाय शोकसागरात बुडाला. हसन बसरी (र) म्हणत असत की, 'ईश्वरा ! हिज्जाजचे जुलमी सामर्थ्य नष्ट कर. ईश्वराची शपथ ! सईद यांच्या हत्येत संपूर्ण जगातील अत्याचार नष्ट कर. ईश्वराची शपथ ! सईद यांच्या हत्येत संपूर्ण जगातील लोक जरी सामील असते तर सर्वच्या सर्वच नरकाग्नीत पोहोचले असते.'

सईद बिन जुबैर यांची हिज्जाज बिन यूसुफच्या हातून घडलेला अंतिम शीरच्छेद होय. यांच्या हत्येनंतर त्यास दुसऱ्या कोणाच्याच हत्येची संधी मिळाली नाही. कारण सईद बिन जुबैर यांच्या हत्येच्या पापाने हिज्जाजचे भांडे भरले होते आणि ईश्वरीय कोपाची वेळ येऊन ठेपली होती. मग काही दिवसांतच त्यास मेंदूचा जीवघेणा रोग जडला आणि मृत्यूशय्येवर जीवनाचे अंतिम क्षण मोजू लागला. त्याची शुद्ध हरवून जात असे. त्याला स्वप्न पडते. स्वप्नात सईद बिन जुबैर त्यास विचारतात,

"हे ईश्वरद्रोही, तू मला कोणत्या अपराधास्तव ठार मारलेस?"

तो घाबरून आणि झोपेतून हडबडून जागा होतो. सर्वांगास घाम फुटतो. तो मोठ्याने ओरडतो, "मी सईद बिन जुबैरच्या हत्येच्या पापातून कसा मुक्त होईन?" मग त्यास एक असह्य रोग जडतो. वाळवंटातील उष्ण वातावरणातसुद्धा तो थंडी भरल्यासारखे थरथर कापू लागतो. आगीच्या शेकोट्या त्याच्या सभोवताली पेटविण्यात येतात. प्रत्येक वैद्य त्याचा आजार न ओळखून आश्चर्यचकित होतो. अन्न-पाणी बंद होते. शेवटी अशा भयानक स्वरुपाचा मृत्यू त्याचा खातमा करतो की जो कोणी ऐकेल त्याच्या अंगावर शहारे येतील.

अशा प्रकारे सईद बिन जुबैर यांनी ईशदरबारी केलेली प्रार्थना की, 'हे ईश्वरा ! माझ्या हत्येनंतर कोणाच्याच हत्येचे सामर्थ्य यास देऊ नकोस', ही प्रार्थना ईश्वराने स्वीकार केली. हिज्जाजला त्यांच्यानंतर कोणाचाच वध करण्याची संधी मिळाली नाही. सईद यांचे जीवन पुण्यकर्मांचा संग्रह होता आणि त्यांचा मृत्यू बलिदान होते.

प्रकरण तिसरे

# इस्लामी शासनकाळातील एक थोर न्यायाधीश

(१)

"मी सहा महिन्यांपर्यंत 'शरीह (र)' यांच्या न्यायालयात कायदेशास्त्राची माहिती मिळविण्यास्तव जात असे. मी त्यांना काहीच विचारीत नसे. त्यांचे न्यायनिवाडे माझ्या माहितीकरिता पुरेसे होत."

(माननीय 'मकहूल')

माननीय 'उमर बिन खत्ताब (र) यांचा इस्लामी शासनकाळ आहे. इस्लामी शासक माननीय उमर (र) हे एका माणसाकडून घोडा विकत घेतात. हा घोडा ते एका घोडेस्वारास पारखण्यासाठी देतात. परंतु घोडेस्वार स्वारी करताना घोडा खाली पडतो आणि आपला पाय गमावून बसतो. माननीय उमर (र) हा घोडा वापस करू इच्छितात, परंतु विक्रेता परत घेण्यास नकार देतो. या प्रकरणाचा निवाडा लावण्यास्तव दोघेजण 'शरीह' यांना मध्यस्त बनवितात. अर्थात न्याय करण्याची जबाबदारी सोपवितात. 'शरीह' निर्णय देतात की,

"माननीय उमर (र) यांना हा घोडा परत करता येणार नाही. परतच करावयाचा असल्यास लंगडा घोडा जशाचा तसा (पूर्वी होता तसा) करून द्यावा."

'माननीय उमर (र) 'शरीह बिन हारिस' यांचा हा न्यायपूर्ण निर्णय पाहून त्यांना 'कूफ़ा' शहराचे न्यायाधीशपद सोपवितात व त्यांचा आपल्याविरुद्ध दिलेला निकाल आनंदाने मान्य करतात. न्यायाधीश हा असाच न्यायी, विधिज्ञ, दूरद्रष्टा, विवेकशील आणि प्रेषितप्रणालीचा प्रगल्भित विद्वान त्याचप्रमाणे न्यायकार्यात शासनाशी न घाबरणाराच असावा लागतो.

'शरीह बिन हारिस' (मृत्यू ७९ हि. सन)

इस्लामी इतिहासात त्यांची गणना अतिमहान न्यायाधीशांत होते. त्यांच्या काही निर्णयांवर इस्लामी इतिहासाची मान गर्वाने उंचावते.

(२)

माननीय अली (र) यांचा शासनकाळ आहे. इस्लामी सत्तेची राजधानी 'मदीना'हून 'कूफ़ा' या शहरी स्थलांतरित झालेली आहे. 'शरीह बिन हारिस' हे इस्लामी शासनाचे प्रमुख न्यायाधीश आहेत. एकदा त्यांच्या न्यायालयात स्वत: इस्लामी शासक माननीय अली (र) आणि एका 'ज्यू' माणसाचे प्रकरण निवाड्यास्तव दाखल करण्यात आले. इस्लामी शासक माननीय अली (र) यांची ज़िरहा (युद्ध प्रसंगी वापरला ज़ाणारा लोखंडी अंगरखा) हरवते व ती एका 'ज्यू' माणसास सापडते. माननीय अली (र) यांना याची माहिती मिळताच ते ती ज़िरहा आपली असून

ती परत देण्याची 'ज्यू' माणसाकडे मागणी करतात. परंतु हा 'ज्यू' म्हणतो की, 'ही ज़िरहा आपली नसून माझी असल्याने मी तुम्हास देऊ शकणार नाही.' शेवटी माननीय अली (र) न्याय मिळविण्यासाठी कोर्टाची पायरी चढतात. मुख्य 'न्यायाधीश शरीह बिन हारिस उभय पक्षांना बोलावून आपापली बाजू मांडण्याचे आदेश देतात. 'ज्यू' माणूस आपल्या दाव्यांच्या पुष्टीस्तव मागणी करतो की, ही ज़िरहा अली (र) यांची असेल तर त्यांनी न्यायालयात साक्षीदार सादर करावा.'' त्यामुळे माननीय अली (र) दोन साक्षीदार उभे करतात. एक आपले चिरंजीव हसन (र) आणि दुसरे कनीर (र) 'शरीह बिन हारिस' म्हणतात की, ''मी क़नीर (र) यांची साक्ष स्वीकार करतो. परंतु हसन (र) यांची साक्ष स्वीकारणार नाही.''

माननीय अली (र) म्हणतात की, 'आपण माझे सुपुत्र हसन (र) यांची साक्ष का स्वीकारणार नाही? हसन आणि हुसैन यांना तर आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांनी स्वर्गातील तरुणांचे सरदार म्हटले आहे.' यावर न्यायाधीश म्हणतात की, 'मला माहीत आहे. परंतु इस्लाम धर्मविधीमध्ये पित्याकडून मुलाची साक्ष ग्राह्य नाही.'

''दुसरा साक्षीदार नसल्यामुळे केवळ एकाच साक्षीदाराच्या साक्षीवर तुमचा दावा रद्दबातल ठरवून ही ज़िरहा 'ज्यू' माणसाच्या स्वाधीन करण्यात येते.'' इस्लामी शासक माननीय अली (र) हे आपल्या विरुद्ध लागलेल्या निकालाचे स्वागत करतात.

हा 'ज्यू' माणूस या निर्णयाने खूप प्रभावित होतो. तो पाहतो की, एक माणूस की जो अफाट पसरलेल्या भूभागाचा सामर्थ्यशाली सत्ताधीश असूनही तो आपल्या सामर्थ्याचा वापर न करता आपली ज़िरहा मिळविण्यासाठी न्यायालयात जाऊन सामान्य नागरिकासम दावेदाराच्या स्वरुपात न्यायाधीशासमोर उभा राहतो. मग न्यायालय त्याच्याबरोबर कोणतेच विशेष वर्तन न करता दोन्ही पक्षांना समोरासमोर उभे करते. न्यायालयाच्या कार्यवाहीतसुद्धा दोघांमध्ये कोणताच भेदभाव न करता न्यायाधीश महोदय इस्लामी कायद्यानुसार निकाल देतात व तेसुद्धा इस्लामी शासक असलेले अली (र) यांच्याविरुद्ध तेसुद्धा या निर्णयाचे स्वागत करून निकाल स्वीकारतात. इस्लामी न्यायालयाचा निस्वार्थी न्याय आणि इस्लामी शासकाची न्यायपूर्ण भूमिका त्यास खूप प्रभावित करते. तो न्यायकक्षेतच घोषणा करतो,

''ही ज़िरहा माननीय अली (र) यांचीच असून ज्या सत्यधर्माचे पालन करणारे मुख्य न्यायाधीश इस्लामी शासकाविरुद्ध निकाल देतात आणि शासकसुद्धा या निर्णयाचा स्वागतपूर्ण स्वीकार करतात, तो निश्चितच सत्याधिष्ठित आहे व मी याच ठिकाणी इस्लामचा स्वीकार करतो.''

माननीय अली (र) त्याच्या इस्लाम धर्म स्वीकारण्यावर इतके आनंदी होतात की, ते आपली मौल्यवान ज़िरहा त्यालाच सदिच्छा व सहर्ष भेट देतात.

## (३)

निरपेक्ष न्यायाचे आणखीन एक उदाहरण पाहु या. न्यायालयात कार्यवाही चालू आहे. आपल्या काळातील महान विद्वत्ते 'अश्अस बिन कै़स' न्यायालयात उपस्थित होत आहेत. सरन्यायाधीश त्यांच्या आगमनाच्या वेळी उठून उभे राहून म्हणतात, "सुस्वागतम गुरुवर्य !" आणि मग त्यांना आपल्या बाजूला बसवितात. एवढ्यात एक माणूस न्यायालयात दाखल होतो. त्याच्या राहणीमानावरून तो एक सामान्य नागरिक वाटत होता. तो गुरुवर्य 'अश्अस बिन कै़स' यांच्याविरुद्ध दावा दाखल करतो आणि न्यायदानाची मागणी करतो. न्यायाधीश महोदय त्याचा दावा दाखल करून घेतात आणि लक्षपूर्वक त्याचा जाब नोंदवितात. त्यांचा संपूर्ण दावा ऐकल्यावर न्यायाधीश महोदयांचा दृष्टिकोन पार बदलून जातो. ते 'गुरुवर्य अश्अस बिन कैस' यांना आदेश देतात,

"अश्शअस ! येथून उठा आणि दावेदाराच्या बाजूला उभे राहून दाव्याचे उत्तर द्या !"

गुरुवर्य अश्शअस न्यायाधीशांच्या या वर्तनावर आश्चर्य व्यक्त करून म्हणतात की, 'मला येथेच बसू द्यावे. येथूनच मी दावेदाराच्या प्रश्नांची उत्तरे देतो.' न्यायाधीश शरीह मोठ्याने आदेश बजावतात,

"तत्काळ उभे राहून दावेदाराच्या बाजूस जाऊन उभे राहा, अन्यथा शिपायांकरवी उचलून तुम्हास..." न्यायालयात निरव शांतता .. गुरुवर्य अश्अस निमूटपणे उठून दावेदाराच्या बाजूस जाऊन उभे राहतात.

## (४)

न्यायाधीशास न्यायापासून दूर करण्यास बरीच साधने प्रोत्साहित करतात. उदाहरणार्थ, उच्चाधिकाऱ्यांचा दबाव, त्यांचा दर्जा व प्रतिष्ठेची जपणूक, सिफारशी, लाचखोरी, या बाबींमुळे कोणत्याही न्यायाधीशास योग्य निकाल देणे अशक्य होऊन बसते. कधीकधी सत्याचे आकलन न झाल्यामुळे अथवा एखाद्याच्या वरवर दिसत असलेल्या प्रतिष्ठितपणामुळेसुद्धा न्यायाधीश चुकीचा निकाल देऊ शकतो. या ठिकाणी अशा काळातील न्यायप्रणालीचा उल्लेख होत आहे की, ज्या काळामध्ये न्यायव्यवस्थेवर उच्चाधिकारीवर्ग आणि स्वत: राज्य शासकाच्यासुद्धा दबावाची कल्पना करणे शक्य नाही. न्यायदानामध्ये कोणाचीच प्रतिष्ठा, व्यक्तिमत्त्व, हुद्दा, अधिकार व सिफारस अडसर येत नसल्याचे उदाहरण आपण वरील प्रकरणात अभ्यासले आहे. एक सामान्यच नव्हे तर अतिसामान्य माणूससुद्धा देशाच्या अतिप्रतिष्ठित नागरिकाविरुद्ध खटला दाखल करून त्यास आरोपीच्या पिंजऱ्यात उभे करून जाब विचारू

शकत असे. कोणीही कितीही मोठा भांडवलदार अथवा अधिकारी आणि शासकसुद्धा आपल्या बळाचा, पैशाचा वा सामर्थ्याचा गैरवापर करण्याची हिंमत करू शकत नसे. आपले जुने मित्र, स्नेही व प्रतिष्ठित विद्वान असलेल्या गुरुवर्यांनादेखील न्यायाधीश सर्रासपणे आरोपीच्या पिंजऱ्यात उभे राहण्याचा आदेश बजावताना आपण पाहिले आहे.

नातलग व मित्रमंडळीसुद्धा न्यायव्यवस्थेत अडसर येत नसत. स्वत: दावेदारपक्षाची इच्छा असूनदेखील न्यायप्रकरण दुसऱ्या न्यायालयात हस्तांतरित करण्याचा नियमच नव्हता. इतर न्यायाधीशांप्रमाणेच 'शरीह' यांच्या न्यायालयातसुद्धा त्यांचे नातेवाईक, स्नेही आणि मित्रांचे खटले दाखल होत आहेत व न्यायदानामध्ये ते कोणत्याही प्रकारचे नाते व मैत्री अडसर सिद्ध होऊ देत नसत.

एकदा एका न्यायालयीन खटल्यात त्यांचे सुपुत्र एका आरोपीस जामीन होतात. आरोपी पळून जातो. न्यायाधीश महोदय आरोपीच्या ठिकाणी जामिन झालेल्या आपल्या सुपुत्रास कारावासात पाठवितात.

एकदा त्यांच्या एका नोकराने एकास कोरड्याने बदडले. तो जखमी अवस्थेत शरीह यांच्या न्यायालयात गेला व न्यायदानाची मागणी केली. शरीह यांनी स्वत:च्या नोकरास न्यायालयात उभे करून आरोपीच्या हाती कोरडा देऊन सर्वांसमक्ष बदडविले.

एकदा न्यायाधीश शरीह यांच्याच परिवाराच्या एका माणसाने एकावर अत्याचार केले. न्यायाधीश महोदयांनी त्या आरोपीस इमारतीच्या एका खांबास बांधून ठेवले. न्यायालयीन कामकाज संपल्यावर सर्वजण आपापल्या घरी जाऊ लागले. सर्वजण गेल्यावर त्यांचा परिवारजण असलेला आरोपी त्यांना विनंती करू लागला की, मला सोडून द्यावे. परंतु सरन्यायाधीश त्यास खडसावतात, "मला सांगून काहीच उपयोग होणार नाही. तुला सत्याधिकारांतर्गत कैद करण्यात आले आहे. (अर्थातच न्यायालयात माझा आदेश चालत नसून सत्य व न्यायाचा आदेश चालतो.)

(५)

एकदा त्यांच्या सुपुत्राचा काही अधिकारांच्या बाबतीत काहीजणांशी तंटा झाला. या तंट्याच्या बाबतीत मुलगा त्यांना म्हणतो की, "प्रकरण जिंकण्याची शाश्वती असेल तरच मी हे प्रकरण न्यायप्रविष्ट करणार अन्यथा गप्प बसणार." शरीह आपल्या सुपुत्रास खटला दाखल करण्याचा सल्ला देतात. खठला शरीह यांच्याच न्यायालयात सुरु होतो. परंतु निकाल मात्र त्यांच्या सुपुत्राविरुद्ध लागतो. घरी आल्यावर त्यांचा मुलगा त्यांना सांगतो की, "आपला

सल्ला घेतला नसता तर परवडले असते. आपणच सल्ला दिला आणि माझ्याविरुद्ध निकाल दिला. अशा प्रकारे मला बेअब्रू करण्याची काय गरज होती?''

सरन्यायाधीश शरीह बिन कैस यांचे आपल्या पुत्रास दिलेले उत्तर इतिहासाच्या पानावर सुवर्णाक्षराने लिहिण्यासारखे आहे. त्यांनी आपल्या पुत्रास उत्तर दिले,

''माझ्या लाडक्या चिरंजीवा ! तू माझा अतिलाडका पुत्र आहेस. तुझ्यावर माझे खूप प्रेम आहे. परंतु तुझ्या प्रेमापेक्षाही ईश्वर कितीतरी महान आहे. तुझ्या खटल्यामध्ये सुरुवातीलाच मला तुझ्या प्रतिवाद्यांचा वैध अधिकार स्पष्ट दिसत होता. मी जर तुला पूर्वीच हे सांगितले असते तर तू त्यांच्याशी तडजोड केली असती. अर्थातच प्रतिवादी आपल्या पूर्ण अधिकारांपासून वंचित झाले असते. कारण त्यांना माहीत आहे की तू न्यायधीशाचा सुपुत्र असून मुलाच्या प्रेमापोटी किंवा पुत्रप्रेमापोटी निकाल त्यांच्याविरुद्ध लागण्याची शक्यता नाकारता येत नाही. या भयापोटी त्यांनी निश्चितच तुझी तड़जोड़ स्वीकारली असती व आपल्या पूर्ण अधिकारास मुकले असते. म्हणूनच मी हा खटला न्यायप्रविष्ट करण्याचा तुला सल्ला देऊन त्यांचा पूर्ण अधिकार त्यांना मिळवून दिला.''

लाचखोरीसुद्धा न्यायदानात खूप मोठा अडसर असतो. प्रत्येक काळात न्यायालयात आणि शासकीय कार्यालयात लाचलुचपती सर्रासपणे चालू असतात. लाचलुचपतीचे स्वरुपसुद्धा बदलत असते. लाच देण्याचे व घेण्याचे एक प्रतिष्ठित स्वरुप सप्रेम भेट आहे. लफडेबाज लोक अथवा आपले काम करून घेणारे लोक आपली वैध आणि अवैध कामे करवून घेण्यासाठी लाचलुचपतीची हीच प्रतिष्ठित पद्धत अवलंबितात. मुख्य न्यायाधीश शरीह बिन कैस यांच्याकडेसुद्धा भरपूर भेटवस्तू येत असत. परंतु भेटवस्तू स्वीकारल्यानंतर तेसुद्धा आपल्याकडून भेटवस्तू त्यांना देऊन त्याचे स्वरूप बदलत असत.

(६)

न्यायाधीशवर्ग कधीकधी गैरसमजुतीस बळी पडून चुकीचा निर्णय देतात. वस्तुस्थितीचा आढावा घेण्यासाठी अत्यंत सखोल दृष्टीसुद्धा लागते. न्यायधीश शरीह हेसुद्धा खूप सखोल दृष्टी ठेवत असत. प्रत्येक प्रकरणाचा छड़ा लावण्यासाठी त्यांची खूप संशोधनात्मक नजर होती. प्रकरणाचे दर्शणीय स्वरुप पाहून ते प्रकरणाचे आंतरिक स्वरूप ओळखत असत. ते दर्शणीय स्वरुपास पाहून कधीच प्रभावित होत नसत.

एकदा एक स्त्री एका पुरुषाविरुद्ध दावा दाखल करते. ती न्यायाधीशांसमोर ओकासाबोकसी रडू लागते. त्या ठिकाणी इमाम शैबीसुद्धा हजर होते. ते न्यायाधीश शरीह

यांना म्हणतात, "ही स्त्री अतिशय अत्याचारपीडित दिसते." य।वर शरीह म्हणतात की, 'रडणे हे अत्याचारपीडित असण्याचे लक्षण मुळीच नव्हे. प्रेषित यूसुफ (अ) यांच्या भावांनीसुद्धा त्यांना विहिरीत लोटून देऊन आंधळ्या पित्यासमोर रडण्याचे नाटक केले होते."

मुख्य न्यायाधीश शरीह बिन क़ैस प्रकरणाचा गांभीर्याने विचार करतात आणि साक्षीदाराची कसून तपासणी करतात. कोणतेही प्रकरण पुरावे आणि साक्षीदारांवर अवलंबून असल्याने साक्षीदारांच्या जबाबांवरच निकाल द्यावा लागतो. साक्षीदारांची कसून तपासणी केल्यावर त्यांना साक्षीदार साशंक आढळतात. म्हणून न्यायाधीश त्यांना म्हणतात, "मी तुम्हाला पाचारण केले नाही, तुमची इच्छा असेल तर जाऊ शकता. मी तुम्हाला रोखणार नाही. तुमच्या खोट्या साक्षीपासून मलाही सुरक्षित राहू द्या आणि तुम्ही देखील सुरक्षित राहा." एवढे सांगूनही साक्षीदार खोटी साक्ष देण्यापासून परावृत्त झाले नाहीत, तरीसुद्धा न्यायाधीशाचे कर्तव्य हे आहे की, त्यांची साक्ष अवश्य घ्यावी व त्यानुसार निकाल द्यावा. म्हणून त्यांनी साक्षीदारांना वरील उपदेश दिला. परिणामी खोट्या साक्षीवरून चुकीचा निकाल लागतो. अर्थात जी गोष्ट ईश्वराने अवैध ठरविली आहे ती वैध करण्याचा कोणालाच अधिकार नाही, न्यायाधीशांनासुद्धा नाही.

**प्रकरण चौथे**

# त्यागाची न मिटणारी खूण

त्यांनी त्यागाचे असे अविस्मरणीय उदाहरण सादर केले की अशी उदाहरणे इतिहासात क्वचितच आढळतात.

(१)

इराकचा गव्हर्नर हिज्जाज बिन यूसुफ हा 'इमाम इब्राहीम नखई (र) यांच्या शोधात आहे. इमाम इब्राहीम नखई (र) हे आपल्या काळातील प्रसिद्ध थोर विद्‌वान आणि 'कूफ़ा' शहरातील 'प्रेषितवचन शास्त्राचे' तज्ज्ञ आहेत. सडेतोड़ भूमिका आणि परखड़पणे मत मांडण्याचे त्यांचे कौशल्य सर्वश्रुत आहे. ते जूलमी राज्यपाल हिज्जाज बिन यूसुफविरुद्ध उघडउघड बोलत असत. जिवाची पर्वा न करता त्याच्या समक्ष उभे राहून त्याची सडेतोड़पणे कानउघाडणी करीत असत. त्याचा खुलेआम धिक्कार करीत. एकदा त्यांच्या प्रवचन संमेलनात एकाने प्रश्न केला, "हिज्जाजला धिक्कारण्याच्या बाबतीत आपले काय मत आहे?" यावर ते गंभीरपणे उत्तरले, "दिव्य कुरआनात ईश्वराचा आदेश आहे की,

"अत्याचाऱ्यांवर ईश्वराचा धिक्कार आहे."

हिज्जाजच्या जुलमी व अरेरावी शासनाविरुद्ध जेव्हा 'मुहम्मद बिन अब्दुर्रहमान बिन अश्अस (र) यांनी सशस्त्र उठाव केला तेव्हा बरेचसे विद्‌वान व सदाचरणी मुस्लिम ताबेइनी (प्रेषितसोबत्यांचे शिष्य) त्यांची साक्ष दिली. या साथीदारांमध्ये इमाम इब्राहीम नखई देखील जातीने सामील झाले. आणि म्हणूनच हिज्जाज त्यांचा शीरच्छेद करण्यासाठी त्यांच्या मागावर होता. त्याचे शिपाई आणि खबरे त्यांच्या शोधात संपूर्ण शहर पिंजून काढ़ीत होते.

(२)

'कूफ़ा' शहर अंधाराची चादर पांघरुन गाढ़ झोपी गेले आहे. परंतु इमाम इब्राहीम नखई (र) ईश्वरासमोर भक्तीभावात मग्न आहेत. ते सामुदायिक नमाज कधीच सोडत नसत. यापासून गफलत धार्मिक जीवनाकरिता संकटमय सिद्ध होते, असे ते मानित असत. नमाजसाठी उभे राहिल्यावर ते ऐहिक जीवनास पार विसरून जाऊन ईशस्मरणात मग्न होत. नमाजमध्ये त्यांच्या तल्लीनतेची अशी अवस्था होती की, चिमणी त्यांच्या पाठीवर बसत असे, परंतु त्यांना त्याची जाणीवही होत नसे. परलोकी जीवनाची तमा सतत त्यांना भेडसावत असे. ते म्हणत असत की, 'मी जेव्हा आपल्या कथन आणि कृत्याची तुलना करतो तेव्हा माझ्या जिवाचा थरकाप उडतो.

कारण जो जसे बोलतो तसेच त्याने वागायला पाहिजे. अन्यथा ईश्वराच्या दृष्टीत तो खोटारडा आणि दांभिक समजला जातो.' इब्राहीम नखई यांच्या जीवनाचा आणखीन एक सुंदर पैलू आहे. ते त्याग आणि बलिदानाची जणू मूर्ती आहेत. इतरांच्या सुखसमृद्धीकरिता ते स्वत:च्या सुखशांतीचे बलिदान देत असत. उपाशीपोटी राहणे पसंत करीत, परंतु याचकाला कधीच रिकाम्याहाती परत करीत नसत.

एकदा इब्राहीम नखई आपल्या मोहल्ल्याच्या मस्जिदमध्ये ईशस्मरणात मग्न होते. एवढ्यात जुलमी राज्यपालाचे शिपाई त्यांना अटक करण्यासाठी त्यांना घेराव घालतात. नमाज़ संपल्यावर ते पाहतात की, शिपायांनी त्यांना घेराव घातलेला आहे. एक शिपाई पुढे येऊन विचारतो,

"इब्राहीम नखई आपणच आहात ?"

"होय ! मीच."

"आणि आपल्या पित्याचे नाव ?"

"यज़ीद ! " इब्राहीम शांतपणे उत्तर देतात.

"शेवटी तुम्ही सापडलातच !" शिपाई आनंदाने अक्षरश: ओरडतो.

"आमच्या कचाट्यातून कोणताच अपराधी सुटत नाही. आम्ही त्यास आकाश-पाताळातूनही हुडकून काढतो." तो स्वत:च्या हुशारीवर खूप मोठ्याने हसतो. इब्राहीम नखई यांच्या लक्षात पूर्ण प्रकरण येते. त्यांना हे कळून चुकते की, इब्राहीम बिन यज़ीदुल नखई समजून हे आपल्यालाच पकडून नेत आहेत. हे तर खूप चांगले. इब्राहीम बिन यज़ीदुल नखई समजून हे जर आपल्यालाच ठार करीत असतील तर एका थोर विद्वानाचे प्राण वाचतील. त्यांनी गुपचुपपणे स्वत:ला त्यांच्या स्वाधीन करून टाकले. 'इब्राहीम बिन यज़ीद' यांना अटक करून राज्यपाल हिज्जाज समोर हजर करण्यात येते. तो शाहनिशा न करताच त्यांना साखळदंडात कसून व पायात बेड्या टाकून 'दीमास'च्या कारागृहात त्यांची रवानगी करतो. हे कारागृह हिज्जाजने कठोर शिक्षा देण्यासाठी विशेष करून तयार केलेले होते. पाऊस, थंडी आणि रखरखीत उन्हापासून बचावाचे येथे कोणतेच साधन नसून केवळ उंचच उंच भिंतीचे व छत नसलेले हे भयानक कारागृह तयार करण्यात आलेले होते. या ठिकाणी पाठविण्यात आलेला प्रत्येकजण मृत्यू पावूनच बाहेर पडत असे.

## (३)

'इब्राहीम तैमी' यांच्या शोधात त्यांची माता अतिशय कासावीस झालेली आहे. त्यांचा कोठेच थांगपत्ता लागत नाही. कसेबसे तिला वार्ता मिळते की, सारखेच नाव असल्याने इब्राहीम नखई समजून हिज्जाजचे शिपाई त्यांच्या मुलालाच पकडून घेऊन गेले आहेत. ती माता आपल्या काळजाच्या तुकड्यास भेटावयास कारागृहात पोहोचते. परंतु कारागृहातील वातावरणामुळे बदललेले इब्राहीमचे स्वरुप पाहून ती मुलास ओळखू शकत नाही. कारण मुलाच्या शरीराचा अक्षरश: सांगाडा झालेला, रंग काळाकुट्ट पडलेला. मुलाची ही दुर्गती पाहून तिचे अश्रू अनावर होतात. ती रडतरडत म्हणते,

"बेटा तू सांगितले का नाहीस की तू इब्राहीम बिन यज़ीद नसून इब्राहीम तैमी आहेस."

"माते ! इब्राहीम बिन यज़ीद नखई हे न्यायाची प्रखर मशाल आहे व यापासून न्यायाचे हजारो दिवे लावले जाऊ शकतात. या प्रखर मशालीस अत्याचाराच्या वादळापासून सुरक्षित ठेवावयास हवे. त्यांचे जीवन रयतेचे फार मोठे भांडवल व अनामत आहे. माझ्या प्राणाच्या बलिदानामुळे जर ही मशाल सुरक्षित राहात असेल तर हे माझ्यासाठी खूप मोठे भाग्य असेल." इब्राहीम तैमी यांनी आपल्या मातेस समजावले. यावर या शूरवीराची माता आपल्या लाडक्या पुत्रास म्हणाली,

"बेटा तुझे बोलणे अगदी सत्य आहे. त्यांना कोणतीही हानी पोहचू नये. मी तुला मन:पूर्वक आशीर्वाद देते की, ईश्वर तुझे हे बलिदान स्वीकार करो..."

## (४)

'इब्राहीम तैमी' या कारागृहात कठोर शिक्षा भोगत असतात आणि मग एके दिवशी या ऐहिक जगातूनच कायमची त्यांची सुटका होते. (ईश्वर त्यांना स्वर्गात श्रेष्ठ दर्जा देवो) याच रात्री जुलमी राज्यपाल 'हिज्जाज बिन यूसुफ़'ला स्वप्न पडते. कोणाचा तरी आवाज येतो, 'आज शहरामध्ये एका स्वर्गीय माणसाचा वध झाला. तो सकाळी उठून तपास करतो तेव्हा त्यास इब्राहीम बिन तैमी कारागृहात वारल्याचे आढळते. तो जुलमी किंचाळतो, "हे तर सैतानी स्वप्न आहे." मग तो आपल्या आसुरी भावनेची आग विझविण्यास्तव त्यांचे शव फेकून देण्याचा आदेश देतो.

**प्रकरण पाचवे**

# 'येमेन'चा बुद्धिमान पुरुष

'ताऊस' हे येमेन येथील ईशभक्त होते. ईशभक्तीमुळे त्यांच्या कपाळावर नमाजच्या सजद्याचे चिन्ह स्पष्ट दिसत होते. जीवनाच्या अंतिम क्षणीसुद्धा ते अंथरुणावरच उभे राहून नमाज़ अदा करीत असत. त्यांनी तब्बल चाळीस वेळा हजयात्रा केली. (कथन : इब्ने हिब्बान)

(१)

येमेनचा राज्यपाल 'मुहम्मद बिन यूसुफ' हा शाही प्रासादामध्ये विराजमान आहे. पहारेकरी येऊन सांगतो की, "ताऊस बिन कैसान (मृत्यू १०६ हिजरी सन) आत येण्याची परवानगी मागत आहेत. त्यांच्यासोबत 'वहब बिन मुनब्बा (र) सुद्धा आलेले आहेत." राज्यपाल मुहम्मद बिन यूसुफ स्वत: पुढे येऊन त्यांचे स्वागत करतो आणि आपल्या गादीवर बसण्याची विनंती करतो. वेळ सकाळची असून कडाक्याची थंडी पड़त आहे. 'ताऊस बिन कैसान' थंडीने कुडकुडत असून त्यांच्या शरीरावर चादरसुद्धा नव्हती. राज्यपाल सेवकास आदेश देतो, "यांच्याकरिता एक उबदार चादर आणावी." सेवक आज्ञेचे तत्काळ पालन करतो. सेवक त्यांच्या शरीरास चादरीने झाकतो. परंतु 'ताऊस बिन कैसान' आपल्या तोंडाने शब्द न उच्चारता शिरावरून चादर काढून परत करतात. त्यांचे हे कृत्य पाहून राज्यपाल मुहम्मद बिन यूसुफच्या तळपायाची आग मस्तकास भिड़ते. राज्यपालाकडून देण्यात येणारी शाही भेट अशा प्रकारे ठोकरणे त्यास मुळीच सहन होत नाही. कारण हा राज्यपालसुद्धा जुलमी व अत्याचारी राज्यपाल हिज्जाज बिन यूसुफ़चाच भाऊ आहे. ज्याच्या मुखातून निघणारा प्रत्येक शब्द हा कायदा असून या कायद्याच्या इशाऱ्यावर कित्येक निरपराध लोकांचा वध करण्यात आला. कित्येक स्त्रिया विधवा आणि कित्येक मुले अनाथ झाली. वहब बिन मुनब्बा राज्यपाल इब्ने यूसुफचा संताप पाहून मनातल्या मनात घाबरतात. सेवक राज्यपालाचा राग पाहून जागच्या जागीच थबकतो. आपल्या स्वामी (राज्यपाल) कड़े अभूत नजरेने पाहतो. जणु तो आपल्या नजरेने विचारित आहे की, आदेश असल्यास यांचे शीर एकाच वारामध्ये धडावेगळे करतो. परंतु 'ताऊस बिन कैसान' यांच्यावर कशाचाही कोणताच परिणाम होत नाही.

ते अगदी शांतपणे प्रासादाबाहेर पडतात तेव्हा त्यांचे सोबती वहब बिन मुनब्बा म्हणाले, "तुम्हाला त्या चादरीची गरज नव्हती, तरी राज्यपालास नाराज करण्याची काय गरज होती? स्वत:स नको असल्यास ती बाजारात विकून आलेले पैसे गोरगरिबांना दान केले असते तर नसते का जमले?"

"मला जर या गोष्टीची भीती नसती की, माझ्या कृत्यास प्रमाण समजून लोकांनीसुद्धा असे आचरण वैध ठरवावे, तर मी निश्चितच असे केले असते." ताऊस उत्तरले.

ताऊस बिन कैसान (र) आपल्या काळातील उच्चपदस्त विचारवंत आणि धार्मिक तत्त्वज्ञांपैकी एक होते. ते स्वत: गुलाम होते आणि त्यांचे पितासुद्धा गुलाम होते. परंतु त्यांच्या विद्वत्तेमुळे मोठमोठे श्रीमंत आणि खानदानी लोक त्यांच्याकडून ज्ञानलाभ आणि मार्गदर्शन घेत असत आणि त्यांचे शिष्य असण्याचा अभिमान बाळगत असत. ते महान ताबेई (प्रेषितसोबत्यांचे शिष्यवर्य) आहेत. त्यांनी एकूण पन्नास प्रेषितसोबत्यांकडून धर्मज्ञान मिळविले असून त्यांना प्रेषितवचने तोंडपाठ होती. त्याचप्रमाणे ते इस्लामी विधीशास्त्राचे गाढे अभ्यासक होते. त्यांची प्रसिद्धी खूप दूरवर पसरलेली होती. त्यांच्या समकालीन असलेले सर्व विद्वान त्यांच्या विद्वत्तेची मुक्तकंठाने प्रशंसा करीत.

ते श्रीमंत आणि समृद्धजणांच्या बैठकीत व सभांमध्ये सहसा कधीच भाग घेत नसत. पैशांची आणि भौतिक सुखसोयींची अथवा शक्तीची मस्ती माणसाला सत्य जाणून घेण्यास अडसर बनते. तसेच या मस्तीमुळे माणूस आपल्यापेक्षा दुर्बल असणाऱ्यावर अन्याय करीत असतो, असे त्यांचे मत होते. म्हणून ते अशा श्रीमंतांपासून दोन पावले दूरच असत. एवढेच नव्हे तर ते आपल्या याच भूमिकेनुसार इब्ने यूसुफसारख्या राज्यपालाचा राग ओढवून घेतात, परंतु त्याने भेट म्हणून दिलेली चादर स्वीकारत नाहीत. असेच एकदा त्यांनी राज्यपालाने भेट म्हणून पाठविलेली मोठी आर्थिक मदत परत पाठविली होती.

(२)

एकदा उमर बिन अब्दुल अज़ीज़ (र) त्यांना सल्ला देतात की, त्यांनी राज्यशासकांची भेट घेऊन आपल्या जीवनावश्यक वस्तुंची मागणी करावी. परंतु ताऊस त्यांचा सल्ला स्वीकारत नाहीत आणि म्हणतात, "मला याची गरज नाही." उमर बिन अब्दुल अज़ीज़ (र) यांना, खूप आश्चर्य वाटले. या बाबतीत त्यांची विचारसरणी अता (र) यांच्या कथनावरून स्पष्ट होते. अता (र) कथन करतात की,

"एकदा 'ताऊस बिन कैसान (र)' माझ्या घरी येऊन म्हणाले की, हे अता...आपल्या गरजपूर्तींची विनवनी अशा लोकांसमोर करू नये की, जे याचकांसाठी आपल्या घरांचे दरवाजे बंद करतात व ज्यांनी आपल्या घरी पहारेकरी बसविले आहेत. आपल्या गरजपूर्तींची याचना केवळ अशा शक्तीसमोरच करावी की ज्याचे द्वार नेहमीकरिता सर्वांसाठीच खुले आहे. आणि जो कोणाचाच आश्रित नाही. जो सर्व मानवनिर्मितीस उद्देशून सांगतो की, माझ्याचसमोर आपले प्रश्न

मांडावेत. माझ्याकडेच मदत मागावी. केवळ मीच तुमची मदत करण्यास समर्थ आहे. अर्थात त्यांचा इशारा एकमेव ईश्वराकडे आहे. जे लोक श्रीमंत आणि समृद्ध आहेत आणि जगामध्ये ज्यांच्या श्रीमंतीची चर्चा आहे, त्यांची दृवारे तर याचकांसाठी नेहमीच बंद आहेत. त्यांनी आपल्या द्वारांवर पहारेकरी बसवून ठेवले आहेत की जेणेकरून गरजवंतांनी त्यांच्यापर्यंत पोहोचू नये. यदाकदाचित त्यांनी कोणाची मदत केलीच तरी ही मदत करणे आपले परमकर्तव्य असल्याकारणाने न करता यामागे त्यांचा दुसराच स्वार्थ प्रेरित असतो. दुर्बलांची मदत करणे हे तर सबलांचे परमकर्तव्य असते. ही कर्तव्यनिष्ठा त्यांच्या मदतीचे कारण व प्रेरणा मुळीच नसते, म्हणून ते आपले दरवाजे गरजवंतांसाठी बंद करतात. गरजवंतांची वाट न पाहता ते स्वत: आपल्या बंगल्यातून बाहेर पडून गरजवंतांचा शोध घेतात की जेणेकरून त्यांच्यावर उपकार करून आजीवन त्यांच्याकडून आपला स्वार्थ साधावा.

या उलट जे लोक आपली श्रीमंती आणि वैभव ही ईश्वराची अनामत समजतात आणि दुर्बलांची मदत करणे आपले परमकर्तव्य समजतात व ईश्वराच्या प्रसन्नतेची मागणी समजतात, ते जोपर्यंत गरजवंतांची गरज अगदी गुपचुपपणे व इतर कोणासही न सांगता पूर्ण करीत नाहीत, तोपर्यंत त्यांना झोप येत नाही.

राज्यपाल 'इब्ने यूसुफ'च्या दरबारातून बाहेर पडताना त्यांनी आपले मित्र वहब बिन मुनब्बा यांना उद्देशून म्हटले होते, की लोक त्यांचे हे कर्म प्रमाण समजून आचरण करतील. याचा अर्थ असा की, विद्‌वान मंडळीचे आचरण आणि वागणे इतरांसाठी मार्गदर्शन सिद्ध होते. ते समाजाचे नेते असतात. त्यांचे आचरण, वागणे आणि त्यांची भूमिका सत्य समजून सामान्य जनता त्यांचे अनुकरण करते. सामान्य जनता आपले आचरण त्यांच्या भूमिकेच्या कसोटीवर पारखतो. त्यांचप्रमाणे हे मानवी दौर्बल्य आहे की, माणूस उच्चकोटीची भूमिका, चांगुलपणा व सदाचार मोठ्या मुश्किलीने अंगीकारतो. या उलट या सद्‌वर्तनांपासून खूप लवकर दूर पळतो. हा मानवी स्वभाव आहे. मग जेव्हा तो आपल्या नेत्यांमध्ये अथवा मार्गदर्शक विद्‌वनांमध्ये सद्‌वर्तनात दौर्बल्य पाहतो, तेव्हा तोसुद्धा आपल्या वर्तनातील व सदाचारातील दौर्बल्य वैध असण्याची निमित्ते खरी असण्याची समजूत करून घेतो. परिणामी सामान्य स्थितीत त्यास आपल्या सद्‌वर्तनाच्या पडत्या स्थितीची जाणीव होत नाही. मग तो हळूहळू खालच्या पातळीवर जातो, जातच राहतो व शेवटी खोल गर्तेतत बुडून जातो. म्हणून विद्‌वानजण आणि नेतेमंडळींचे हे परमकर्तव्य आहे की, त्यांनी आपले प्रत्येक पाऊल खूप जपून आणि वारंवार विचार करून टाकावे. आपल्या मागे अशा पाऊलखुणा सोडाव्यात की, येणाऱ्या पिढ्या चुकीच्या वळणांवर जाता कामा नये. आपल्या जीवनप्रवासास भ्रष्ट मार्गावर जाऊ देता कामा नये."

(३)

'ताऊस बिन कैसान (र)' हे आपल्या काळातील थोर नेते आहेत. शिक्षण, मार्गदर्शन आणि विधी तत्वज्ञानात जनसमुदायाच्या एका भल्या मोठ्या वर्गास त्यांचे मार्गदर्शन लाभले आहे. इतर इस्लामी विद्वानांप्रमाणेच तेसुद्धा सत्तालोलूप, श्रीमंत व अधिकारीवर्गापासून खूप दूर असत. अशांकडून कोणत्याच प्रकारची भेट ते स्वीकारत नसत. राजकीय व्यवस्थेवरील असलेली धर्माची पकड सैल झाली आणि समाजाची वेसण अशा लोकांच्या हाती गेली की जे स्वार्थी, सत्तालोलुप, लोभी, अत्याचारी व अन्यायी आहेत. आपला स्वार्थ साधण्यासाठी असे सत्तालोलुप लोक स्वार्थी आणि इहवादी विचारवंतांना हाताशी धरतात. याच कारणास्तव खऱ्या आणि धर्मनिष्ठ विद्वानांनी श्रीमंत व राजकारण्यांपासून स्वत:स दूर ठेवले. त्यांची कोणतीच भेटवस्तू स्वीकारली नाही. त्यांची कोणत्याच प्रकारची मदत स्वीकारली नाही. आपले सत्याधिष्ठ अंत:करण त्यांच्याकडे गहाण ठेवले नाही. त्यांच्या धमक्यांना भीक घातली नाही. उलट शासक व राज्याधिकाऱ्यांसमोर जिवाची पर्वा न करता सत्याची घोषणा केली. त्यांच्या गैरवर्तन व अन्यायाविरुद्ध परखडपणे त्यांची कानउघाडणी केली. कित्येकांना यासाठी आपल्या प्राणांचा बळी द्यावा लागला. अन्यायी व निधर्मी शासकांच्या कळसूची बाहुल्या बनण्याऐवजी त्यांनी हौतात्म्य पत्करले. 'ताऊस बिन कैसान' यांची स्थिती तर अशी आहे की, ते बादशाहने बांधलेल्या विहिरीचे पाणी आपल्या पाळीव जनावरासही पाजत नसत.

(४)

ताऊस बिन कैसान (र) यांची ही निस्पृहता, अभिमान आणि पवित्र चारित्र्य इतरांसाठी मार्गदर्शक सिद्ध झाले. परखड व्यक्तिमत्त्वाची अवस्था अशी आहे की, 'हज' च्या वेळी बादशाह सुलैमान बिन अब्दुल मलीक पाहात आहे की, एक साधारण माणूस काब्याची प्रदक्षिणा घालत आहे. परंतु तो साधारण माणूस अत्यंत सुंदर, देखणा आणि महान विद्वान वाटत आहे. बरेच शिष्यवृंद त्याचे अनुकरण करीत आहेत. बादशाह सुलैमान इमाम ज़हरी (र) यांना विचारतो, ''ही कोण व्यक्ती आहे ?''

''हे 'ताऊस बिन कैसान (र)' येमेनी आहेत. प्रेषितसोबत्यांचे शिष्यवर्य.'' ज़हरी (र) बादशाहला सांगतात, बादशाह त्यांना बोलावून विनंती करतो की, एखादे प्रेषितवचन सांगावे. 'ताऊस बिन कैस (र)' म्हणतात, ''मी माननीय अबू मूसा अश्अारी (र) कडून आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांचे वचन ऐकले आहे की,

''ईश्वराचा कोप अशा व्यक्तींवर कधीही व केव्हांही होऊ शकतो ज्याच्यावर मुस्लिमांची जबाबदारी सोपविण्यात आलेली आहे आणि तो त्यांच्याशी न्याय करीत नाही.''

बादशाहच्या कपाळावर आठ्या पडतात, परंतु तो आपली मान खाली घालतो. थोड्या वेळाने परत मान वर करून म्हणतो, ''आणखीन एखादे प्रेषितवचन सांगावे.''

ताऊस म्हणतात,

''आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांच्या सोबत्यांपैकी माननीय अली (र) यांनी माझ्यासमोर हे प्रेषितवचन कथन केले की,

'आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांनी एकदा माननीय अली (र) यांना 'कुरैश' कबिल्याच्या एका भोजनसभेत निमंत्रण दिले आणि भोजन आटोपल्यावर म्हणाले की, कुरैश कबिल्याच्या लोकांचा इतरांवर अधिकार आहे व इतरांचासुद्धा कुरैश कबिल्यांच्या लोकांवर अधिकार आहे. कुरैश लोकांचा इतरांवर अधिकार तोपर्यंत राहील, जोपर्यंत कुरैश लोक दयेची मागणी करणाऱ्यांवर दया करतील. म्हणून त्यांना जर शासन मिळाले तर रयतेशी न्याय करावा. त्यांचे रक्षण करावे. जर त्यांनी असे न केल्यास ईश्वराचा आणि देवदूतांचा त्यांच्यावर धिक्कार असो. या धिक्कारास ते पात्र ठरल्यास ईश्वर त्यांचे कोणतेच पुण्यकर्म स्वीकारणार नाही.'' सुलेमान बादशाहाने मान खाली घालून परत उचलली व म्हणाला,

''आणखीन एखादे प्रेषितवचन सांगावे.''

ताऊस बिन कैसान म्हणतात,

''दिव्य कुरआनात ईश्वराचा आदेश आहे की, ह्या दिवसाचे भय बाळगा ज्या दिवशी तुम्हाला ईश्वरासमक्ष जाब देण्यासाठी हजर करण्यात येईल आणि प्रत्येकास आपल्या करणीचा बरा व वाईट मोबदला देण्यात येईल. व त्या (अंतीम निवाड्याच्या) दिवशी कोणावरच अन्याय होणार नाही.''

हे ऐकून सत्तेच्या उन्मादात मस्तावलेल्या सुलैमान बादशाहचे काळीज पार हादरून जाते व तो परत पश्चात्तापाने आपली मान खाली करतो. या शिवाय बादशाह 'हश्शाम बिन अब्दुल मलिक' बरोबर 'ताऊस' यांचा संवाद तर खूपच विलक्षण आहे. बादशाह 'हश्शाम बिन अब्दुल मलिक' एकदा हज करण्यासाठी मक्केस आला. त्या वेळी तो सेवकास म्हणाला, ''जा आणि प्रेषितवचनांच्या एखाद्या विद्वानास घेऊन या की ज्याने आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांच्या सोबतींमध्ये जीवन व्यतीत केले असेल.'' सेवक म्हणाला, ''राजवर्य ! आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांचे सोबती तर आता या जगात राहिले नाहीत.'' बादशाह म्हणाला, ''मग प्रेषितसोबत्यांच्या शिष्यवर्यांपैकी कोणाला घेऊन या.'' बादशाहच्या आज्ञापालनास्तव तत्कालीन विद्वान 'ताऊस बिन कैसान' यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी बादशाह

हश्शाम बिन अब्दुल मलिक यास प्रेषितवचनाची शिकवण द्यावी. ताऊस बादशाहच्या विनंतीवर हजर होतात आणि उंच आवाजात म्हणतात,

"अस्सलामु अलैकुम (ईश्वर तुला शांती प्रदान करो)" त्यांचा आवाज ऐकून बादशाह हश्शाम आश्चर्यचकित होतो. कारण ताऊस यांनी त्यास 'अमीरुल मुअमिनीन' (मुस्लिम जणप्रमुख) सारख्या शब्दाने संबोधित न करता सलाम करतात आणि हे बादशाहच्या प्रतिष्ठेविरुद्ध होते. त्याचप्रमाणे बादशाहसमोर हजर होण्याची कोणतीच औपचारिकता निभावत नाहीत. अद्यापपावेतो तो स्वत:स सांभाळूही शकला नाही की 'ताऊस' यांनी त्यास आश्चर्याचा आणखीन एक धक्का दिला. ते म्हणाले,

"हश्शाम ! कसे आहात ?"

हे शब्द ऐकून बादशाह हश्शामचा संताप अनावर होतो आणि मोठ्याने डरकाळतो,

"ताऊस ! बादशाहचा हा घोर अपमान कशापायी?"

"घोर अपमान ? तो कसा काय ?" ताऊस कोणतीच तमा न बाळगता विचारतात. बादशाह हश्शामचा पारा चढलेला आहे. तो 'ताऊस' यांना म्हणतो,

"एक तर तुम्ही तुमची पादत्राणे बिछायतीजवळच ठेवलीत. मग 'अमीरुल मुअमिनीन' (मुस्लिम जणप्रमुख) न म्हणता सलाम केला आणि मला बादशाहसारख्या प्रतिष्ठित शब्दाने न संबोधता माझ्या स्वत:च्याच नावाने संबोधत आहात. हा बादशाहचा अपमान नव्हे काय?"

'ताऊस बिन कैस' बादशाहच्या चेहऱ्याचे हावभाव मोठ्या गंभीरपणे पाहात आहेत. बादशाहचा राग थोडा कमी झाल्यावर ते म्हणतात,

"मी माझी पादत्राणे शाही बिछायतीच्या जवळ ठेवल्याने तुम्हास राग आला. मी दररोज पाच वेळा ईश्वर दरबाराच्या बिछायतीजवळ पादत्राणे सोडतो, तरीपण त्याला या गोष्टीचा राग येत नाही. राहिला प्रश्न हा की, मी तुम्हास 'अमीरुल मुअमिनीन' (मुस्लिम जणप्रमुख) या नावाने संबोधले नाही. तर याचे कारण हे आहे की, सर्व मुस्लिमजणांनी तुमचे राज्यशासन स्वीकारले नाही. म्हणून तुम्हाला 'मुस्लिम जणप्रमुख' या उपाधीने संबोधणे योग्य नाही. कारण या नावाने संबोधणे म्हणजे असत्य बोलणे ठरेल. दुसरा मुद्दा असा की, मी तुम्हाला प्रतिष्ठित शब्दांनी संबोधले नाही. तर स्वयं ईश्वरानेच आपल्या लाडक्यांना केवळ नावानेच संबोधले. उदाहरणार्थ, हे दाऊद, हे यहया, हे मूसा... तर दुसरीकडे ईश्वराने त्याच्या शत्रूंना टोपण नावाने संबोधित केले, उदाहरणार्थ, "हे आगीच्या पित्या ! तुझे दोन्ही हात तुटतील !" हे ऐकून हश्शाम बादशाह संतापाचे घोट गिळून बसला.

(९)

ताऊस बिन कैसान (र) हे येमेन देशाचे रहिवासी होत. येमेन देश संशोधन आणि ज्ञान - विज्ञानाचे प्रमुख केंद्र आहे. अशी दिव्यवाणी आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांनीच स्वत: केलेली आहे. ताऊस बिन कैसान (र) सुद्धा विद्वत्तापूर्ण सद्विचारांचे सागर होते. आपणही या विचारसागरातून काही माणिकमोती वेचू या.

ताऊस बिन कैसान म्हणतात,

१) "बोलणारा ईशपरायण हा मौन राहणाऱ्या ईशपरायणापेक्षा श्रेयस्कर आहे."

२) "ऐहिक गोडवा हा पारलौकिक कडवेपणा आहे."

३) "जो माणूस अनाथांचा वाली, न्यायदाता अथवा वाली नसतो त्याला ईश्वरीय परीक्षणाची काय कल्पना असेल ?"

४) "लोकांना न दर्शविता केलेली ईशभक्ती श्रेष्ठ भक्ती होय."

५) "लग्न करावयाचे असल्यास प्रामाणिक परिवारात करावे."

ताऊस बिन कैसान यांचे हे बोल किती विद्वत्तापूर्ण आहेत. ते नेहमी म्हणत असत की, 'लग्नाशिवाय माणसाची उपासना परिपूर्ण होत नाही.' एके दिवशी इब्राहीम बिन मयसरांना म्हणाले, "तुम्ही लग्न करायलाच हवे. अन्यथा मी तुम्हाला तेच सांगेन की जे माननीय उमर (र) यांनी 'अबू ज़वाइद (र) यांना म्हटले होते की, 'तुमच्या लग्नात केवळ दोनच गोष्टी अड़सर असू शकतात, एक दुर्बलता अथवा दुसरा व्यभिचार.' ताऊस हे पारलौकिक जीवनाच्या बाबतीत अतिदक्षता बाळगत. त्यांना पारलौकिक जीवनाची खूप भीती वाटत असे आणि हेच त्यांच्या सदाचाराचे मुख्य कारण होते.

ताऊस श्रीमंत व अधिकारीवर्गापासून अलिप्त राहत असत, परंतु वेळोवेळी व आवश्यक प्रसंगी त्यांची कानउघाडणीसुद्धा करीत असत. उमर बिन अब्दुल अज़ीज़ (र) यांनी जेव्हा शासनाची धुरा सांभाळली तेव्हा त्यांना त्यांनी स्पष्ट शब्दात लिहून पाठविले,

"शासन उत्तम रितीने चालवायचे असल्यास शासकीय अधिकार प्रामाणिक व सभ्य लोकांच्या हाती द्यावे."

उमर बिन अब्दुल अज़ीज़ (र) यांनीसुद्धा त्यांच्या प्रामाणिक सल्ल्याचा आदर केला व म्हणाले,

"माझ्या ऐहिक आणि पारलौकिक भलाईकरिता एवढा सल्लासुद्धा पुरेसा आहे."

## प्रकरण सहावे

ते गुलामपुत्र होते. परंतु राजेरजवाडेसुद्धा त्यांच्या दरबारी हजर होत असत.

(१)

बादशाह सुलैमान बिन अब्दुल मलिक हजयात्रेहून परत येताना मदीना शहरास भेट देण्यासाठी आला. राज्याचे मोठमोठे अधिकारी आणि फौजफाटा त्याच्या सोबत होत.

"येथे एखादी अशी व्यक्ती आहे काय की जिने प्रत्यक्षात आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांच्या सोबत्यांकडून धर्माचे ज्ञान मिळविलेले आहे?" ... त्याने विचारले.

"होय ! अबू हाज़िम (र) हे आहेत. त्या सुवर्णकाळाची खूण !" ... त्यास उत्तर मिळते.

"अबू हाज़िम (र) यांना हजर करण्यात यावे !" तो आदेश देतो.

राजसेवक बादशाह सुलैमानचा आदेश अबू हाज़िम (र) कडे घेऊन जातो.

"माझे बादशाहशी काय देणेघेणे?" शाही आदेश ऐकून अबू हाज़िम अतिशय निस्पृह भावाने म्हणतात. राजसेवक निराश होऊन बादशाहला वृत्तान्त सांगतो.

"मला तुमच्याकडून ज्ञानार्जण करावयाचे आहे." बादशाह परत निरोप पाठवितो.

"ज्ञानार्जन ?" अबू हाज़िम आश्चर्य व्यक्त करून म्हणतात.

"माझ्यासारख्या भिकाऱ्याजवळ कसले ज्ञान?" ते उत्तर देतात.

बादशाह सुलैमान सेवकांकरवी अबू हाज़िमचे शब्द ऐकून म्हणाला,

"ठीक आहे. मी स्वत:च आपल्या दरबारी येत आहे."

(२)

बादशाह सुलैमान स्वत:हून अबू हाज़िम (र) यांच्या सेवेत हजर झालेला आहे. त्याच्या सोबत प्रेषितवचनांचे प्रसिद्ध तज्ञ इमाम ज़हरी (र) व आणखीन एक व्यक्ती आहे. अबू हाज़िम (र) आणि बादशाह सुलैमान यांची चर्चा चालू आहे. इमाम ज़हरी (र) आणि ती व्यक्ती गुपचुपपणे चर्चा ऐकत आहेत.

बादशाह सुलैमान : "हे अबु हाज़िम (र) आमच्यावर हा अन्याय कशापायी?"

अबू हाज़िम (र) : "ईश्वराशपथ ! यापूर्वी आपण एकमेकांना मुळीच ओळखत नव्हतो. मग मी तुमच्यावर अन्याय कसा काय करणार बरे ?"

बादशाह सुलैमान (इमाम ज़हरी (र) यांच्याकडे पाहून) : "गुरुवर्य सत्य बोलत आहेत. चूक माझीच होती. (अबू हाज़िमकडे वळून) आम्ही मृत्यूस का घाबरतो ?"

अबू हाज़िम : "कारण तुम्ही ऐहिक समृद्धीस्तव आपले पारलौकिक जीवन वाया घालविले आहे. म्हणून समृद्धीकडून कठोर शिक्षेकडे जाताना तुम्हाला भीती वाटते."

बादशाह सुलैमान : "तुम्ही सत्य सांगितले गुरुवर्य! ईश्वराजवळ आम्ही शेवटी पाठविलेच काय?"

अबू हाज़िम : "आपले कर्म ईशग्रंथाच्या कसोटीवर पारखावे."

बादशाह सुलैमान : "त्यात कोठून मार्गदर्शन मिळेल ?"

अबू हाज़िम : "ईश्वराने म्हटले आहे, पुण्यकर्मी स्वर्गात आणि पापी व अपराधी नरकाग्नीत असतील. ज्या ठिकाणी अंतिम निवाड्याच्या दिवशी पोहोचतील तेथून सुटू शकणार नाहीत." (दिव्य कुरआन)

बादशाह सुलैमान : "आणि ईश्वराची प्रेमळ माया कोठे मिळेल ?"

अबू हाज़िम : "प्रामाणिक, दीनदुबळे, अन्याय व अत्याचारपीडित लोकांच्या सहवासात मिळेल."

अबू हाज़िम (र) चे शब्द यांचे हृदयतळात जाऊन शिरतात. तो भावनाविवश होतो. त्याचे अश्रू अनावर होतात. तो आपला शाही गर्व आणि स्वाभिमान पार विसरून जातो. त्याचे दु:ख अनावर होते आणि विनसायास त्याच्या तोंडून शब्द बाहेर पडतात...

"केवढे हे दु:ख !!!" मग स्वत:स सावरून म्हणाला,

"आम्ही अंतिम निवाड्याच्या दिवशी ईश्वरासमोर कोणत्या अवस्थेत हजर केले जाऊ ?"

अबू हाज़िम : "नेक व चांगुलपणा असलेले लोक ईश्वरभेटीसाठी असे आतुर होतील जसे कोणी बरेच दिवस आपल्या परिवारापासून दूर झाल्यावर भेटण्यासाठी आतुर होतो. तसेच पापी, अपराधी आणि दुर्बलांवर अन्याय व अत्याचार करणारे हातापायांत बेड्या घातलेल्या गुलामांप्रमाणे ईशदरबारी हजर करण्यात येतील."

बादशाह सुलैमानचा तोल जातो. भावना अनावर होतात. तो जोरजोराने रडू लागतो. मग हलके झाल्यावर बोलू लागतो, "हे अबू हाज़िम (र)! हा ईशप्रमाणित चांगुलपणा कसा अंगीकारावा?"

अबू हाज़िम : "अन्याय व अत्याचार सोडून द्यावे. न्याय आणि दयाभावाच्या मार्गावर चालावे."

बादशाह सुलैमान : "ते कशा प्रकारे ?"

अबू हाज़िम : "आपला वैध अधिकार घ्यावा आणि लोकांचा व रयतेचा वैध अधिकार त्यांना द्यावा रयतेची काळजी घ्यावी."

बादशाह सुलैमान : "सर्वात महान सत्य काय आहे ?"

अबू हाज़िम : "अशा मानवासमोर सत्य वचन बोलावे की, ज्याच्याकडून लोकांना भय आणि आशा असते. अर्थात सत्य बोलण्यापायी त्याचे भय बाळगू नये व त्याच्याकडून मिळणाऱ्या मदतीची आशा मावळण्याचीही भीती बाळगू नये."

बादशाह सुलैमान : "कोणते दान श्रेष्ठदान आहे ?"

अबू हाज़िम : "ते छोटेसे दान जे माणूस एखाद्या गरजवंतास देतो, परंतु त्याला त्याच्यावर करण्यात आलेल्या उपकारांची जाणीव होऊ देत नाही. त्यास बोलून दाखवित नाही की, मी तुझ्यावर उपकार केले. तसेच कोणासमोरच त्याची वाच्यता करीत नाही की, जेणेकरून त्याला दु:ख होईल."

बादशाह सुलैमान : "कोणती प्रार्थना ईश्वर दरबारी स्वीकारण्यात येते ?"

अबू हाज़िम : "इतरांवर उपकार व दया करणाऱ्याची प्रार्थना ईश्वर दरबारी लवकर स्वीकारण्यात येते."

बादशाह सुलैमान : "सर्वांत बुद्धिमान माणूस कोण ?"

अबू हाज़िम : "जो ईश्वरीय आदेशांचे पालन करतो आणि इतरांनाही याचे मार्गदर्शन करतो."

बादशाह सुलैमान : "आणि सर्वांत मूर्ख मनुष्य ?"

अबू हाज़िम : "जगी सर्वांत मूर्ख माणूस तो आहे की, जो एखाद्या अन्यायी व जुलमी व्यक्तीची मदत करतो व त्याचे ऐहिक जीवन समृद्ध करण्यास्तव आपले पारलौकिक जीवन उद्ध्वस्त करतो."

बादशाह सुलैमान : "आमच्या राज्य शासनाबाबत आपले काय मत आहे ?"

अबू हाज़िम : "लोक मुस्लिमांच्या मताशिवाय आणि मर्जीशिवाय शासनकर्ते होऊन बसले आहेत. ते ऐहिक गरजांसाठी लोकांचा रक्तपात घडवित आहेत. आपली मनमनी करीत आहेत."

सुलैमान बादशाहचा सोबती मनातल्या मनात क्षुब्ध आणि लज्जित होत जातो. शेवटी मौन तोडून जोराने ओरडून म्हणतो,

"गुरुवर्य ! तुम्ही ही खूप वाईट गोष्ट केली."

अबू हाज़िम : "हे वाईट मित्रा ! ईश्वराशपथ, तू खोटे बोलत आहेस. ईश्वराने धर्मपंडितांकडून वचन घेतले आहे की, त्यांनी लोकांसमोर सत्य स्पष्ट करावे. त्यास मुळीच लपवू नये."

बादशाह सुलैमान : "गुरुवर्य, आपण आमच्यासोबत राहणे पसंत कराल काय? आम्ही आपल्याकडून ज्ञानलाभ घेऊ आणि आपण आमच्यातर्फे अर्थलाभ घ्यावा."

अबू हाज़िम : "मुळीच नाही !"

बादशाह सुलैमान : "का बरे ?"

अबू हाज़िम : "ईश्वरास सोडून आपल्यावर कसा विश्वास ठेवू ? मला भीती आहे की ईश्वर मला द्विगुणित शिक्षा देईल."

बादशाह सुलैमान : "एखाद्या गोष्टीची गरज असल्यास सांगावे."

अबू हाज़िम : "माझ्या ईश्वराने मला जे काही दिले ते पुरेसे आहे. मी त्याच्यावर राजी आणि समाधानी आहे." बादशाह सुलैमानला पुन्हा गहिवरून येते.

बादशाह सुलैमान : "मला उपदेश करावा !"

अबू हाज़िम : "तुम्हाला मिळालेले शासन हे वडिलोपार्जित असून तुमच्या मृत्युमुळे तुमच्या हातूनही ते जाणारच, जसे की तुमच्या वाडवडिलांच्या हातून निघाले. ज्या ठिकाणांपासून ईश्वराने तुम्हास रोखले, त्या ठिकाणी ईश्वराने तुम्हास हजर असलेल पाहू नये, तसेच जेथे हजर राहण्याचा आदेश देण्यात आला आहे, तेथे गैरहजर पाहू नये."

बादशाह सुलैमान निरोप घेतेवेळी, काही रक्कम त्यांना स्वीकारण्याची विनंती करतो. परंतु अबू हाज़िम म्हणतात,

"जी बाब मी तुमच्याकरिता पसंत करीत नाही ती माझ्यासाठी कशी काय पसंत करीन?" तुम्ही काय करमणुकीस्तव माझ्याशी चर्चा करीत होता काय? मन रमविण्यासाठी प्रश्न विचारले होते काय? आणि मी आपल्यांकडून बक्षीस उकळण्यासाठी उत्तरे दिली आहेत काय? तुम्ही सादर करीत असलेली रकमेची थैलीच जर या उत्तरांचा मोबदला असेल, तर ते अवैध आणि निषिद्ध आहे. जर तुम्ही मला गरजवंत समजून देत असाल तर खरे पाहता मला सध्या कशाचीच गरज नाही."

(३)

या धर्मविड्या विद्वान नि:स्वार्थी महापुरुषाने बादशाह सुलैमानची मदत उघडपणे नाकारली. अबू हाज़िम (र) हे 'मदीना' शहरातील दूरद्रष्टे असलेल्या व्यक्तींपैकी एक असून त्यांच्याकडून ज्ञानार्जन करण्यासाठी त्यांचे समकालीन विद्यार्थीगण दूरदूरचा प्रवास करून येत असत. 'अबू हाज़िम' हे त्यांचे टोपण नाव असून त्यांचे खरे नांव 'सल्म' असे आहे. ते एका गुलामाच्या पोटी जन्मले. परंतु ज्ञानार्जनाच्या व संशोधनपूर्ण अभ्यासाच्या जिद्दीने पेटून त्यांनी विद्येची मोठमोठी शिखरे सर केली. 'सहल बिन साअद', 'अनस बिन मालिक', आणि 'अब्दुल्लाह बिन मालिक (र)' यांच्या सारख्या उच्चकोटीच्या प्रेषितसोबत्यांचा शिक्षणसहवास त्यांना लाभला आहे. त्याचप्रमाणे 'साअद बिन मुसैयिब', 'अता बिन अबी रिबाह', 'इमाम मालिक,' 'इब्ने अजलान हम्माद', 'सुफ़ियान सूरी', 'इब्ने अबी ज़हब' आणि 'सुफियान बिन ऐनिया'सारखे शिष्य त्यांनी तयार केले. या शिष्यांपैकी प्रत्येकाने जग अस्तित्वात असेपर्यंत आपल्या ज्ञान व तत्त्वज्ञानाने संपूर्ण मानवजातीकरिता मार्गदर्शक पाऊलखुणा आपल्या मागे सोडल्या आहेत.

'अबू हाज़िम' यांचे संपूर्ण जीवन सत्य धर्माचे एक उदाहरण आहे. ते स्वत:स उद्देशून म्हणत असत,

"हे लंगड्या ! अंतिम निवाड्याच्या दिवशी दवंडी देण्यात येईल की, हे लोकहो, ज्यांनी अशा अशा प्रकारची पापकर्मे केली आहेत. हे लंगड्या ! तू यांच्या रांगेत उभा असलेला दिसशील काय? हे लंगड्या ! अपराधी समूहाच्या रांगेत उभे राहणे तुला आवडेल काय? अरेरे! खूप दु:ख वाटते तुझ्या दुरवस्थेचे !"

कधीकधी स्वत:स म्हणत,

"लक्षात घे! जेव्हा तू मरशील तेव्हा तुझ्या मरणाच्या शोकापायी जग बंद पडणार नाही. शेवटी तुझे महत्त्वच काय आहे? तू एक तुच्छ मानव आहेस. स्वत:स ओळख !!!"

ते थोर बुद्धिमान व्यक्ती होते. साहित्याची चांगली जाण त्यांना होती. अगदी लहान लहान वाक्यांमध्ये मोठमोठे आशयसागर स्पष्ट करण्यात ते खूप तरबेज होते. एकदा मदीना शहराचा राज्यपाल त्यांना म्हणाला, "काही उपदेश करावा, जेणेकरून आमच्या ज्ञानात भर पडेल." यावर अबू हाज़िम (र) म्हणाले, "तुमच्या दारासमोर उभे असलेल्या लोकांवर नजर टाका. त्यांच्यात भले आणि प्रामाणिक लोक तुमच्याजवळ असतील तर समजा वाईट वृत्तीचे आणि लबाड़ लोक आपोआपच वेगळे होतील आणि तुमच्याजवळ लबाड़ असतील तर तुम्ही चांगल्या व प्रामाणिक लोकांना मुकाल."

हे वाक्य गंभीरपणे विचार करण्यासारखे आहे. यामध्ये मानसशास्त्रीय दृष्टिकोन स्पष्ट करण्यात आला आहे. अर्थात चांगले आणि वाईट प्रवृत्तीचे लोक एके ठिकाणी गोळा होऊ

शकत नाहीत. यापैकी ज्या प्रवृत्तीच्या लोकांना जवळ कराल तर त्याच्या विरुद्ध प्रवृत्तीचे लोक आपोआपच दूर होतील. म्हणजे लबाड लोकांना जवळ केल्यास प्रामाणिक लोक दूर होतील. म्हणजेच तुमच्या दारावर प्रामाणिक लोक जमलेले आहेत आणि ज्यांना पाहून लोकांना वाटते की, तुम्ही प्रामाणिक व सदाचाऱ्यांची साथ देत आहात तेव्हा तुमच्या हाताखालील अधिकारीवर्ग नक्कीच लबाड आहे.

एके दिवशी 'याकूब बिन अब्दुर्रहमान' यांना उपदेश करतात, "दोन गोष्टी अशा आहेत की, त्यांना आचरणात आणल्याने ऐहिक व पारलौकिक जीवनात संपूर्णपणे यश लाभेल. प्रथम हे की, ती बाब पसंत करा जी तुम्हास पसंत नाही, परंतु ईश्वरास पसंत आहे. दुसरे हे की, ती बाब वाईट समजा जी तुम्हाला आवडते परंतु ईश्वरास आवडत नाही."

अबू हाज़िम (र) यांची प्रवचनसभा अतिशय विद्वत्तापूर्ण विचारांनी ओतप्रोत असे. आपण त्यांच्या उच्च विचारांच्या माळेतील काही पुष्प वेचू या.

१) मृत्यूची भीती ज्या कर्मामुळे वाटते, ते प्रत्येक कर्म सोडून द्यावे. यामुळे कधीही येणाऱ्या मृत्यूचे भय तुम्हास वाटणार नाही.

२) जो माणूस ईश्वराशी चांगले संबंध ठेवतो, ईश्वर त्याचे इतरांशी संबंध चांगले ठेवतो. या उलट ईश्वराशी संबंध बिघडल्यास मानवांशीसुद्धा संबंध ईश्वर बिघडवितो.

३) कोणत्याही एकाच व्यक्तीची साथ देणे हे अनेक व्यक्तींच्या साथ देण्याच्या तुलनेत जास्त सोपे आहे.

४) लोकांना काय झाले आहे? गप्पा तर खूप मोठमोठ्या मारतात, परंतु आचरणाची वेळ आल्यास पळ काढतात.

५) ऐहिक जीवनात होणारा तोटा ही एक कल्पना आहे आणि जे बाकी राहते ती केवळ आशा आहे.

६) एका श्रद्धावंताने सर्वांत जास्त स्वत:चे कठोर परीक्षण करावे आणि स्वत:च्या अभिलाषांना पापांपासून दूर ठेवावे, की जेणेकरून प्रत्येक मुस्लिमांसाठी ते आशास्थान व्हावे.

७) जोपर्यंत इस्राईल (ज्यू) समाजाचे शासक धर्मविद्वानांचे मार्गदर्शन घेण्यास्तव त्यांच्या सेवेत हजर होत असत, तोपर्यंत ते इष्ट मार्गावर वाटचाल करीत होते. परंतु जेव्हा त्यांनी भ्रष्ट मार्गाचा अवलंब केला, ते ईश्वराच्या दृष्टीतून उतरले. मग त्यांनी खोट्या उपासकांची भक्ती सुरु केली, तेव्हा त्यांच्यातील धर्मशास्त्रीसुद्धा त्यांच्या दरबारी हजेरी देऊ लागले व त्यांच्या लबाडीत सामील झाले.

**प्रकरण सातवे**

# ज्ञानदेशाचा गुलाम शासक

किती तरी लोक आणि शासन नष्ट झालेली आपण पाहिली. परंतु त्यात कितीतरी शिखरे अबांधित राहिली. लोक नष्ट झाले, परंतु ते पर्वत आणि शिखरे अजूनही बाकी आहेत.

(इब्नुल ख़तीब)

(१)

'अबू अब्दुल्लाह मकहूल' (मृत्यू ११८ हिजरी सन.) हे आपल्या भाषणासनावर बसलेले आहेत. ते आपल्या समकालीन मोठमोठ्या विद्वानांपैकी एक आहेत. मदीना शहरी 'सईद बिनुल मुसैयिब (र), कूफ़ामध्ये आमिरुल शैबी (र), बसरामध्ये हसन बिन अबुल हसन (र) आणि दमास्कसमध्ये चौथे धर्मपंडित हेच 'अबू अब्दुल्लाह मकहूल (र) होय. मकहूल यांनी इस्लामच्या छत्रछायेत आपल्या जीवनाचा प्रारंभ एका गुलामाच्या स्वरुपात केला. गुलामीची कल्पनाच मुळात एक हृदयद्रावक बाब वाटते. हे थोर विद्वानसुद्धा गुलाम होते. परंतु इस्लाममध्ये गुलामीची जी कल्पना आहे, ती सध्याच्या स्वातंत्र्यापेक्षाही कितीतरी श्रेयस्कर आहे. आधुनिक काळातील स्वातंत्र्य इस्लाममधील गुलामीवर ओवाळून टाकावे! ते गुलाम बनून इस्लामच्या छत्रछायेत आले नसते, तर कदाचित काबुलच्या 'सेहराब' नावाच्या या अनोळखी व्यक्तीच्या या 'अबू अब्दुल्लाह मकहूल' नावाच्या पुत्रास कोणी ओळखलेही नसते. इस्लामच्या गुलामीचा हा लाभ आहे की, ते गुलामीच्या गर्तेतून उठून श्रेष्ठत्वाच्या अतिउंच शिखरावर जाऊन पोहोचले. त्यांचा उल्लेख तत्कालीन मोठमोठ्या विद्वानांच्या मुखावर आहे. ज्ञानाची तहान घेऊन लांबलांबचा प्रवास करून लोक त्यांच्याकडे येतात आणि आपल्या ज्ञानाची तृष्णा भागवितात. त्यांच्या शिष्यवृंदामध्ये 'इमाम ज़हरी'सारखे प्रेषितवचन तज्ज्ञ आणि मोठमोठे धर्मपंडित आहेत. 'इमाम औज़ाई'सारखे इस्लामी विधिज्ञ, मुहम्मद बिन इसहाक़ विद्वान, 'मुहम्मद बिन अजलान' आहेत. एवढेच नव्हे तर 'हमीदुत्तवील', 'मूसा बिन यसार', 'सईद बिन अब्दुल अज़ीज़', 'अय्युब बिन मूसा', 'यहया बिन सईद अन्सारी', 'उसामा बिन जैदेशी', 'साबित बिन सौबान', 'हिज्जाज बिन अरतान', 'अब्दुर्रहमान बिन झैद', 'अक्रमा बिन अम्मार'सारखे एकापेक्षा एक धर्मविद्वत्ते त्यांचेच शिष्य आहेत.

एवढे मोठे विद्वान असूनही 'मकहूल' यांच्यात विद्येचा तसूभरही गर्व नव्हता. विनयशीलता हे त्यांचे विभूषण होते. कोणी जर फतवा मागण्यास आला तर ते स्पष्टपणे सांगत असत की, ''मी जो फतवा देत आहे त्याची इतरांकडूनही शाहनिशा अवश्य करून घ्यावी.'' अर्थात ते आपला शब्द अंतिम शब्द ठरवीत नसत.

आता आपण त्यांच्या विद्यासागरातून काही माणिकमोती वेचू या. ते म्हणत असत,

१) ज्याने एखाद्या सदाचारी पुरुषाशी प्रेमपूर्वक संबंध स्थापित केले, जणू त्याने या गोष्टीचा पुरावाच दिला की, त्याचे ईश्वरावर प्रेम आहे. जो माणूस ज्ञानार्जनासाठी आपल्या घरून निघतो, तो ज्ञान शिकून परत येईपर्यंत स्वर्गाच्या मार्गावर असतो.

२) दिव्य कुरआनचा अभ्यास करावा आणि ज्या कर्मांपासून त्याने रोखले आहे त्या कर्मांपासून दूर राहा. कुरआनचा अभ्यास करून जर तुम्ही निषिद्ध बाबी सोडत नाहीत तर, तुम्ही कुरआनचा अभ्यास केलाच नाही असे मानावे.

३) ज्यांचा आत्मा पवित्र झाला, त्याच्या विचार व बुद्धीमध्ये वाढ झाली. तसेच ज्याने आपले शरीर व पोषाख पवित्र ठेवला, त्याचे दु:ख कमी झाले.

४) द्रोही दांभिकांशी करार करू नका. कारण ज्यांनी ईश्वराशी झालेला करार तोडला, ते तुमच्याशी केलेला करार कसा काय तोडणार नाहीत?

५) चार गोष्टी मानवास मोक्ष मिळवून देतात. १) कृतज्ञता २) श्रद्धा ३) प्रार्थना आणि ४) आपल्या अपराधांची ईश्वराकडे क्षमायाचना करणे.

ईश्वराने दिव्य कुरआनात म्हटले आहे की,

१) "जर तुम्ही ईश्वराची कृतज्ञता व्यक्त केली आणि ईश्वरावर, प्रेषितांवर आणि परलोकावर श्रद्धा ठेवली तर ईश्वराच्या कोपापासून मुक्ती मिळेल."

२) "जे लोक ईश्वरदरबारी आपल्या पापांची क्षमायाचना करतात, ईश्वर त्यांच्यावर कोपणार नाही."

३) "जर तुम्ही याचना केली नसती तर ईश्वराने तुमची पर्वा केली नसती."

याचप्रमाणे तीन गोष्टी अशा आहेत की ज्यामुळे मानव नष्टप्राय आणि बरबाद होतो. त्या म्हणजे, १) दंभ २) ईश्वराविरुद्ध बंड आणि ३) दिलेले वचन भंग करणे.

दिव्य कुरआनात ईश्वराने म्हटले आहे की,

१) "दांभिकता आणि दगाबाजी कर्त्यावरच उलटते."

२) "आपल्या बंडखोरीचे परिणाम तुम्हालाच भोगावे लागतील."

३) "ज्याने दिलेले वचन भंग केले, त्याचे परिणाम त्याच्याच गळ्यात पडतील."

'मकहूल' यांनी जी 'प्रेषितवचने' कथन केली आहेत, त्या कथनांवर ते स्वत: आचरण करीत असत. जनकल्याण निधीतून मिळणारा भत्ता ते इस्लामचा प्रसार व प्रचार आणि रक्षणात खर्च करीत असत. धर्मयोद्धयांना युद्धसामग्री पुरवीत असत. त्यांच्या गरजा पूर्ण करीत असत. त्यांच्या अंगठीवर हा मजकूर छापलेला होता की,

''हे ईश्वरा! 'मकहूल' यांना मोक्ष प्रदान कर!'' या मजकुरावरून लक्षात येते की, अंगठी वापरणाऱ्यास सर्वांत जास्त प्रिय बाब 'मोक्ष' आहे. अर्थात त्यांची सर्वांत महत्त्वाची इच्छा व मनोकामना हीच आहे की, ईश्वराने त्यांचे पाप क्षमा करून त्यांना मोक्ष द्यावा. ईश्वराने त्यांना प्रदान केलेल्या विद्येमुळे ते मुक्ताचारी झाले नाहीत. 'मी ज्ञानी पुरुष आहे म्हणून वाट्टेल ते करीन' या अविर्भावात वावरले नाहीत या विद्या व ज्ञानामुळे त्यांचे हृदय अतिशय कोमल, दयाळू, श्रद्धाळू आणि कृतज्ञ बनले. पुण्यकर्मावर वाटचाल करूनही त्यांना भीती वाटते की, माझे कर्म ईश्वराने कदाचित नाकारले तर? म्हणून ते नेहमी ईश्वरकोपाचे भय बाळगत आणि त्याच्याच दयेची भिक्षा मागत.

(२)

आता ज्ञानसभेचा निरोप घेऊ या, परंतु थांबा, हे काय? हा कोण आपल्या सवंगड्यासमवेत येत आहे ? शाही थाट, शाही पोषाख, चेहऱ्यावर फाजील स्वाभिमानाच्या स्पष्ट खुणा, साथीदारांकडून होणाऱ्या मानसन्मानामुळे तो एक मोठा सरदार वाटतो. कदाचित राजकुमार अथवा मग स्वत: बादशाहच असावा. ज्ञानसभेतील विद्यार्थ्यांच्या नजरा त्याच्याकडे उठतात. कोणीतरी हळूच म्हणतो, 'हा राजकुमार यज़ीद बिन अब्दुल मलिक बिन मरवान आहे.'

हा राजकुमार यज़ीद बिन अब्दुल मलिक, भावी बादशाह! प्रेक्षक त्यास बसण्याकरिता जागा मोकळी करून देतात. परंतु एवढ्यात गुरुवर्य मकहूल जोरात सूचना देतात, 'आपापल्या जागी बसा. जागा मोकळी करून देण्याची गरज नाही. त्याला जेथे जागा मिळेल तेथे बसेल. हा राजाचा राजदरबार नसून ज्ञानसभा आहे. येथे नम्रता आणि विनय असावा.'

हा आहे विद्येचा सन्मान ! आपण आश्चर्याने डोळे विस्फारून या दृष्याची कल्पना करीत असाल. कदाचित आपणास सध्याच्या काळातील विद्येच्या अवस्थेचे स्मरण होत असेल. लांबलचक तत्वज्ञान आणि दर्शनशास्त्रांचा गवगवा आहे. परंतु विद्येच्या अपमानाची दुर्दशा अशी झाली आहे की, विद्यार्थीवर्ग एकीकडे मोठमोठ्या डिग्र्या आणि प्रमाणपत्रे मिळवीत आहे, विद्याविभूषणांचे अलंकार गळ्यात मिरवीत आहे, तर दुसरीकडे शासनकर्त्यांच्या पायात लोटांगण घालीत आहे. तसेच अशा मनोकामनांच्या पूर्तीस्तव धडपडत आहे, नव्हे अक्षरश: जीव देत आहे की, शासनकर्त्यांच्या पदचिन्हांनी आपल्या ज्ञानसभा पावन व्हाव्यात. जर शासनकर्त्यांनी त्यांच्याकडे मेहेरबान दृष्टीचा कटाक्ष टाकला नसेल, तर स्वत:च त्यांच्यासमोर नतमस्तक होऊन ज्ञानसभेत येण्याची याचना करतात. त्यांच्या मार्गांमध्ये जीव ओवाळतात. त्यांच्या तथाकथित श्रेष्ठत्वाचे भाटासारखे गुणगान गातात.

प्रकरण आठवे

# प्रेषित जीवनचरित्राचा रक्षक

उमर बिन अब्दुल अज़ीज़ (र) यांनी एकदा आपल्या साथीदारांना विचारले, "तुम्ही 'इब्ने शहाब' यांच्याकडे जात असता का?" साथीदार उत्तरले, "होय! जात असतो." यावर उमर बिन अब्दुल अज़ीज़ म्हणाले, "अवश्य जात राहा. कारण या काळामध्ये प्रेषितवचने आणि प्रेषित जीवनचरित्राचा अभ्यासक त्यांच्यासारखा कोणीच नाही."

(१)

'इमाम ज़हरी इब्ने शहाब (र)' (मृत्यू : १२४ हिजरी सन) हे 'वलीद बिन अब्दुल मलिक' याच्या शासनकाळातील राजपत्रित धर्मपंडित आहेत. बादशाह वलीद हा त्यांचा खूप श्रद्धाळू आहे. धर्माला आणि सत्य वचनाला विकून पोट भरणारा बुद्धीवर्ग आणि विद्वानवर्ग प्रत्येक काळात असतोच. हा वर्ग नेहमी शासनकर्त्यांचा स्वार्थ आणि मार्गभ्रष्टतेस वैध ठरविण्यासाठी इस्लामी विधानांचे आधार व प्रमाण पुरवून स्वार्थ साधत असतो. त्यांची खोटी स्तुती करण्यासाठी आणि त्यांच्या कुकर्मांवर वैधतेचा पड़दा टाकण्यासाठी कुरआनच्या नियमांचा अर्थ चुकीच्या पद्धतीने दाखवीत असतो. असाच स्वार्थी विद्वानांचा एक वर्ग बादशाह वलीदचे राज्य असलेल्या 'सीरिया' देशामध्येसुद्धा आहे. शासनकर्त्यांच्या खोट्या स्तुतीसाठी दररोज नवनवीन क्लृप्त्या लढ़वीत आहेत. नवनवीन चाली खेळत आहेत. त्या काळात असाच एक नवीन डाव त्यांनी खेळला. 'इमाम ज़हरी (र) हे बादशाह वलीदच्या भेटीसाठी दरबारी जात आहेत. बादशाह म्हणाला,

"गुरुवर्य! आपणास ते प्रेषितवचन माहीत आहे काय, जे सीरियावासी आमच्या बाबतीत कथन करीत आहेत ?"

"कोणते प्रेषितवचन ?" इमाम ज़हरी प्रश्न करतात.

"ईश्वर आपल्या एखाद्या दासास राज्य प्रदान करतो, तेव्हा त्याच्या कर्मसूचीमध्ये केवळ पुण्यकर्मच लिहिली जातात, पापकर्मे वगळण्यात येतात." बादशाह वलीद म्हणाला. बादशाहचे हे वाक्य ऐकून 'इमाम ज़हरी यांच्या चेहऱ्याचा रंग बदलतो. संतापाचे चिन्ह त्यांच्या चेहऱ्यावर स्पष्टपणे दिसते. काही वेळाच्या गंभीर मौनानंतर ते म्हणाले, "ज्या लोकांनी हे शब्द 'प्रेषितवचन' असल्याचे सांगितले, त्यांनी आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांच्यावर खोटा आरोप लावला. अशा प्रकारचे कोणतेच 'प्रेषितवचन' अस्तित्वात नाही." इमाम ज़हरी यांच्या बोलण्यात पूर्णपणे आत्मविश्वास जाणवत होता. काही वेळ मौन धरल्यावर ते परत म्हणाले,

"हे राजवर्य! तुम्हीच सांगा की, ईश्वराजवळ प्रेषित असलेला शासक श्रेष्ठ आहे की प्रेषित नसलेला शासक श्रेष्ठ आहे ?"

"प्रेषित असलेला शासक !" बादशाह वलीद उत्तरला.

"तर मग ऐका ईश्वराने दिव्य कुरआनात 'सूरह-ए-साद'मध्ये आपले प्रेषित आणि शासक माननीय दाऊद (अ) यांना संबोधून म्हटले आहे,

"हे दाऊद (अ)! आम्ही तुम्हाला पृथ्वीवर यासाठी आपला प्रतिनिधी (कारण खरा शासक तर स्वत: ईश्वरच आहे.) म्हणून पाठविला आहे की, लोकांवर सत्य आणि न्यायाचे राज्य प्रस्थापित करावे आणि कोणत्याही बाबतीत आपल्या इच्छा व अभिलाषांना थारा देऊ नये. अन्यथा ईश्वराच्या मार्गापासून तुम्ही दूर व्हाल. जे लोक ईश्वराचा मार्ग सोडून मार्गभ्रष्ट होतात, त्यांच्यावर ईश्वराचा कोप कोसळणार. कारण ते अंतिम निवाड्यांचा दिवस हेतुपुरस्सर विसरून गेलेत." हे राजवर्य! ईश्वराचा हा भयभीत करणारा आदेश अशा शासक व प्रतिनिधीस देण्यात आला आहे की, जो ईश्वराचा अवतरित केलेला प्रेषित आहे. तर मग जो शासक प्रेषितसुद्धा नाही, त्याच्या बाबतीत आपण स्वत:च निर्णय घ्यावा."

इमाम ज़हरी एवढे बोलून गंभीर मौन धारण करतात. बादशाह वलीद त्यांचे वक्तव्य लक्षपूर्वक ऐकून झाल्यावर म्हणाला, "हे भाटस्वरूपी, लाळघोटे आणि हांजीखोर असलेले लोक आम्हाला सत्य धर्मापासून पथभ्रष्ट करण्याच्या मार्गावर आहेत."

एकदा तर खूपच विचित्र घटना घडली. बादशाह हश्शामच्या काळातील गोष्ट! त्याने 'इमाम ज़हरी' यांना विचारले, "माता आयशा (र) यांच्यावर लावण्यात आलेल्या आरोपाच्या बाबतीत दिव्य कुरआनातील एक विशिष्ट आयत कोणाच्या बाबतीत अवतरीत झाली होती ?"

"अब्दुल्लाह बिन उबैच्या बाबतीत." जहरी उत्तरले.

"तुम्ही खोटे बोलत आहात." बादशाह कड़ाडला, "ही आयत 'अब्दुल्लाह बिन उबैच्या बाबतीत नव्हे, 'अली'च्या बाबतीत अवतरली. कारण आरोप लावणाऱ्यांमध्ये 'अली' हे सर्वांत पुढे - पुढे होते." बादशाहचे हे वाक्य कानी पडताच इमाम ज़हरी खवळले. त्यांचा संताप अनावर झाला आणि 'बादशाह हश्शाम'ला त्वेषाने म्हणाले, "तुझा बाप खोटा असेल! मी खोटे बोलत नाही मुळीच !! ईश्वराशपथ ! आकाशातून जरी वाणी आली की, ईश्वराने खोटे बोलणे वैध ठरविले तरी मी खोटे बोलणार नाही." 'इमाम ज़हरी (र)' यांच्या या आवेषपूर्ण आणि संतापी वक्तव्याने संपूर्ण राजदरबार हादरून गेला. सगळ्यांच्या चेहऱ्यावर काळजी व तमाच्या खुणा स्पष्ट जाणवत होत्या. बादशाह हश्शाम आपल्या जागी क्षुब्ध आणि स्तब्ध आहे. परंतु

इमाम जहरी यांचा उंच आवाज दरबाराच्या भयान शांततेस तीक्ष्ण भाल्याप्रमाणे चिरत जात आहे. "सईद बिन मुसैयिब, उबैदुल्लाह आणि अल्क़मा या सर्वांनीच मला सांगितले की, माता आयशा (र) यांनी स्वत:च स्पष्ट केले की, कुरआनची वरील आयत 'अब्दुल्लाह बिन उबै'च्या बाबतीत आहे." एवढे सडेतोड़ बोलून 'इमाम जहरी' उठून उभे राहिले, आणि झपाझप पाऊले टाकित राजसभेचा त्याग करून निघून जातात. शेवटी त्यांच्या सत्यवचनाचा प्रभाव बादशाहवर पड़तो आणि म्हणतो,

"आपण विनाकारणच गुरुवर्यांची नाराजी ओढ़ावलीय."

(२)

हे आहेत इमाम ज़हरी (र) ! बादशाह असो की आणखीन कोणी असो. प्रेषित शिकवणीमध्ये अफरातफर केल्यास शासकांनासुद्धा ते जुमानत नाहीत आणि सत्यरक्षणार्थ भरल्या दरबारी ते बादशाहचीसुद्धा सडेतोडपणे कानउघाडणी करतात. तथाकथित लाळघोटे विद्वान बादशाहची मर्जी मिळविण्यासाठी खोटे धर्मवचन तयार करून बादशाहला सांगतात की, "तुम्ही केलेल्या पापांची शिक्षा ईश्वराने माफ केली." परंतु इमाम ज़हरी (र) बादशाहचीसुद्धा गय करीत नसून दिव्य कुरआनच्या सत्यवचनाच्या संदर्भाने मार्गदर्शन करतात. ज्याप्रमाणे ख्रिश्चन धर्मियांमध्ये ही धार्मिक कल्पना आहे की, बादशाहमध्ये ईश्वरीय अंश आहे. त्याने केलेले अपराधसुद्धा पुण्यकर्म आहेत. त्याचा आदेश हा ईश्वरीय आदेश आहे. परंतु इमामसाहेबांनी त्याचे जोरदार खंडन केले. शिवाय बनु उमैया परिवाराचा शासक असलेला बादशाह हश्शाम आणि संपूर्ण बनु उमैया परिवार माननीय अली (र) यांचा द्वेष करीत असे. कोणी माणूस जर त्यांच्यासमोर अली (र) यांचा द्वेष करीत असेल, तर तो बादशाहचा जवळचा स्नेही समजला जात असे आणि अली (र) यांचा समर्थक बादशाहचा शत्रू समजला जात असे. इमामसाहेबांनी भरल्या दरबारी सर्वांसमक्ष माननीय अली (र) यांचे समर्थन केले. त्यांच्या लावण्यात येणाऱ्या खोट्या आरोपाचे बादशाहची नाराजी ओढवून घेऊन खंडन केले. कारण बादशाहची चापलुसी करून सत्य लपविणे त्यांच्या स्वभावात नव्हते. कारण हे सत्य स्वत: दिव्य कुरआनमध्ये स्पष्ट करण्यात आले.

(३)

इमाम ज़हरी (र) हे उच्च नितीमत्तेची मूर्तीच आहेत. स्मरणशक्ती एवढी प्रचंड आहे की, केवळ ऐंशी दिवसांत कुरआन मुखपाठ केले. एकदा बादशाह अब्दुल मलिकने मदीनावासीयांना नाराजी व्यक्त करणारे पत्र लिहिले. मदीनाच्या राज्यपालाने बादशाहचे पत्र जनतेस वाचून दाखविले. पत्र ऐकून लोक आपल्या कामाला लागले. सईद बिन मुसैयिब

यांचे शिष्यवृंद त्यांच्याकडे हजर झाले. सईद बिन मुसैयिब शिष्यांना विचारतात, ''पत्रात काय लिहिले?'' शिष्य म्हणाले, ''एवढे लांबलचक पत्र आमच्या लक्षात राहिले नाही. थोडा थोडा भाग स्मरणात आहे.'' शिष्यांपैकी काहीजणांनी त्या पत्राचा थोडा थोडा मजकूर सांगितला. परंतु सईद बिन मुसैयिब यांचे समाधान झाले नाही. इमाम ज़हरी (र) यांना या गोष्टीची माहिती मिळताच. ते सईद बिन मुसैयिब (र) यांच्या सेवेत हजर होऊन पत्राचा पूर्ण मजकूर तोंडपाठ वाचून दाखवितात.

एकदा बादशाह हिश्शाम स्वत:च त्यांची परीक्षा घेतो. तो इमामसाहेबांना म्हणाला, ''माझ्या मुलासाठी काही प्रेषितवचने लिहून द्यावीत.'' इमामसाहेबांनी त्याच्या विनंतीवरून चारशे प्रेषितवचने त्याच वेळी लिहून दिली. बादशाह खूप आश्चर्यचकित झाला. एका महिन्यानंतर बादशाह म्हणाला, ''इमामसाहेब ! मागच्या महिन्यात आपण लिहून दिलेल्या प्रेषितवचन संग्रहाचा मसूदा कुठेतरी हरवला आहे. आपण परत येताच प्रेषितवचने लिहून द्यावीत.'' इमामसाहेबांनी ती चारशे प्रेषितवचने परत लिहून दिली. बादशाहने एका महिण्यापूर्वी लिहून दिलेला प्रेषितवचन संग्रह सध्याच्या लिहून दिलेल्या संग्रहाशी जुळवून पाहिला. बादशाहच्या आश्चर्यास पारावार उरला नाही. दोन्ही प्रेषितवचन संग्रहांत तसूभरही फरक आढळला नाही. अर्थातच यावरून इमामसाहेबांच्या प्रचंड स्मरणशक्तीचा अनुमान येतो. एकदाची ऐकलेली गोष्ट त्यांच्या स्मरणपटलावर कायमस्वरूपी सुरक्षित होत असे.

इमाम ज़हरी (र) यांच्या लहानपणातच त्यांचे वड़ील वारले. अनाथ असूनही आपल्या प्रयत्नांच्या आणि स्मरणशक्तीच्या बळावर विद्याजगतात त्यानी खूप प्रगती केली, खूप नाव कमाविले. घरोघरी ज्ञानाचा दिवा लागला. गरीब, श्रीमंत, आबालवृद्ध, स्त्री-पुरुष सर्वांनाच ज्ञानदान करून जनतेस उत्तम नीतिमत्तेचे मार्गदर्शन केले. सत्याची जोपासना केली.

(४)

'बोले तैसा चाले, त्याची वंदावी पाऊले' या उक्तीप्रमाणे इमामसाहेब केवळ ज्ञानदानच करीत नसून ते स्वत: आपल्या आचरणाने ज्ञानाचे महत्त्व सिद्ध करीत असत. अफाट विद्या आणि अफाट विनयशीलता, कोणासमोरही न झुकणारे, परखड़ वक्तव्य आणि सत्याचे खंदे पुरस्कर्ते असलेले इमाम ज़हरी (र) महान धर्मयोद्धेसुद्धा होते. ते नेहमी योद्ध्याचा पोषाख परिधान केलेले असत. सढ़ळ हाताने दानधर्म करीत असत. कोणीही याचक त्यांच्या दारासमोरून रिकाम्या हाती परत जात नसे. स्वत:जवळ काही नसल्यास इतरांकडून कर्ज घेऊन लोकांच्या गरजा पुरवीत असत. एखाद्यावर अन्याय वा अत्याचार झालेले त्यांना मुळीच पाहवत नसे. पीड़ितांचे अश्रू पाहून त्यांचा पारा चढ़त असे. त्यास न्याय मिळवून दिल्याशिवाय

त्यांना झोप येत नसे. सार्वजनिक रस्त्यावर ते मोफत भोजन देत असत. कोणीही उपाशी राहिलेले सहन करीत नसत. प्रवासी, अनाथ आणि गोरगरीब पोट भरून जेवण करताना पाहून त्यांच्या डोळ्यांतून आनंदाश्रू वाहात असत.

एकदा ते प्रवासामध्ये होते. प्रवासात एके ठिकाणी त्यांना बावीस वृद्ध स्त्रिया आणि बत्तीस निराधार स्त्रिया आढळल्या. ते त्यांचे पुनर्वसन करण्यासाठी अठरा हजार दिरहम (आज काळातले दहा लाख ऐंशी हजार रुपये) कर्ज काढतात व त्यांचे स्वत:च्या हाताने व्यवस्थित पुनर्वसन करतात.

इमाम ज़हरी (र) यांनी गरिबीचे चटके स्वत: सोसलेले आहेत. तसेच श्रीमंतीची फळेही चाखली आहेत. परंतु त्यांच्या स्वभाव व निश्चयात कुठलाच फरक पडला नाही. ते गरिबीमध्ये कधीच घाबरले नाहीत. श्रीमंतीचा कधीच माज चढू दिला नाही. उमय्या परिवारातील सहा शासकांचा कार्यकाळ त्यांनी पाहिला. जीवनातील खूप चढ़ाव-उतार, उन्हाळे-पावसाळे व चांगले-वाईट दिवस अनुभवले. बादशाह अब्दुल मलिकच्या शासनकाळात ते दमास्कसमध्ये मुख्य सरन्यायाधीश होते. अमाप संपत्ती होती. परंतु या संपत्तीचे त्यांच्याजवळ सत्याच्या तुलनेत काहीच महत्त्व नव्हते.

**प्रकरण नववे**

# सत्यवचनी पुरुष

धर्मपुरुषाचा वचक आणि प्रतिष्ठा पूर्णत: सत्यवचन भावनेचे द्योतक असते, तर सिंकदरासारख्या बादशाहाची शान व प्रतिष्ठा हे केवळ फसव्या संमोहनाचा चमत्कार असतो. धर्मपुरुष संपूर्ण जगावर आपल्या सत्यदृष्टीने विजय प्राप्त करतो, तर सिकंदरासारखा सम्राट आपल्या लष्करी सामर्थ्यांच्या बळावर जगावर अधिराज्य गाजवितो. धर्मपुरुषाचा संदेश पूर्णत: शांततेवर आधारित असतो, तर सम्राट सिकंदरचे अस्तित्वच मुळात बलप्रयोगावर आधारित होते.

दोघेही अवघे विश्व जिंकण्याचे इच्छुक आहेत. सम्राट सिकंदर लष्करी बळाचा वापर करून आणि मानवाची शांतता भंग करून आपला हेतु पूर्ण करीत असतो, तर धर्मपुरुष प्रेम, दयाभाव, सहानुभूती आणि शांतता प्रदान करून आपले ध्येय साधत असतो.

(१)

अब्बासी परिवाराचा बादशाह अबू जाफर मन्सूर आपल्या शाही महालात बसला आहे. सोबत त्याचा मंत्री 'रबीअ'सुद्धा आहे. एवढ्यात एका पहारेकऱ्यासोबत एक वृद्ध प्रवेश करतात. बादशाह मन्सूर त्यांच्या सन्मानार्थ सिंहासनावरून उठतो. मंत्री 'रबीअ'सुद्धा उभा राहतो. वृद्ध महाशय आत दाखल होताच 'अस्सलामु अलैकुम' (ईश्वर तुझे रक्षण करो) म्हणतात. "व अलैकुम अस्सलाम". बादशाह उत्तर देतो आणि आपल्या आसनाशेजारीच त्यांना आसन ग्रहण करण्याची विनंती करतो. पहारेकरी परवानगी घेऊन निघून जातो. वृद्ध महाशय बसल्यावर बादशाह व मंत्री दोघेही बसतात.

"हे गुरुवर्य ! आपण आमच्यापासून दूरदूर का राहता ?" बादशाह म्हणाला.

"राजस ! तुम्हाला माझ्याकडून काय हवे ?" वृद्ध महाशय त्यास विचारतात.

"मला आपल्याकडून भरभरून मार्गदर्शन हवे." बादशाह श्रद्धापूर्वक नजरेने पाहत उत्तर देतो.

"तुमची इच्छा मी कशी डावलणार बरे. यासाठीच तर मी येथे आलो आहे." वृद्ध महाशय शांतपणे आणि प्रेमळ शब्दांत उत्तर देतात. "माझे हे बोलणे लक्षपूर्वक ऐका आणि याची अंमलबजावणी करा." वृद्ध महाशय थोडे कठोर होऊन म्हणतात. जवळच बसलेल्या मंत्री 'रबीअ' यास कळून चुकते की, वृद्ध महाशय आपल्या राज्यात होत असलेल्या अन्यायाकडे संकेत करीत आहेत. त्यांचा पारा चढत जातो आणि तो आपली तलवार खेचताच बादशाह मन्सूर त्यास झिडकारून म्हणतो,

"ही वेळ शिक्षा देण्याची नसून आत्मपरीक्षणाची आहे!" वृद्ध महाशय अतिशय निस्पृहतेने आपले बोलणे सुरु ठेवतात.

"हे राजा! आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांचे वचन आहे की, ज्या माणसासमोर ईश्वराच्या मार्गदर्शक शिकवणी सादर करण्यात आल्या, त्यांचा मनोमन स्वीकार करण्यात यावा आणि शिकवण देणाऱ्याचे व ईश्वराचे आभार मानावे. कारण हे ईश्वरीय वरदान आहे. ईश्वराचे मार्गदर्शक वरदान ज्याने धुडकावले, तो आणखीन पापांच्या गर्तेत बुडत जातो. सोबत ईश्वराचा कोप ओढवून घेतो.

हे राजा ! आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांनी हेसुद्धा म्हटले आहे की, जो शासक आपल्या रयतेविषयी एक रात्रसुद्धा द्वेष आणि नाराजीत घालवितो, ईश्वर त्याच्यासाठी स्वर्ग निषिद्ध ठरवितो.

हे राजा ! जो माणूस सत्यवचन उदारमनाने आणि आचरण भावनेने ऐकून घेणे पसंत करीत नाही, ईश्वरही त्याचा द्वेष करतो. कारण ईश्वर स्वत: सत्य आणि मार्गदर्शक आहे.

हे राजा! तुम्ही स्वत:च्या अभिलाषा पूर्ण करण्यात मग्न आहात. ज्या मुस्लिम व मुस्लिमेतरांवर तुम्ही राज्य करीत आहात, त्यांच्या समस्या तुम्हाला माहीत नाहीत. खरे पाहता रयतेच्या प्रत्येक माणसाचे तुम्ही उत्तरदायी आहात. मग त्या प्रसंगी कशी वेळ असेल की, जेव्हा रयत आपल्याला जाब विचारण्यासाठी पुढे येईल. रयतेमधील प्रत्येकजण अन्याय व अत्याचाराचा जाब विचारेल.

हे राजा! आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) आपल्या श्रद्धावंतांवर खूप दयाळू होते. माणसांच्या पापांवर पड़दा टाकीत असत. त्यांच्या याचना व मागण्या पूर्ण करीत असत. त्यांना अनुग्रह मिळाल्यास आनंदी होत आणि त्यांच्या समस्यांवर चिंतातूर होत असत.

हे राजा ! एकदा आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांच्या हातून एका सामान्य माणसाला चुकून बोचकारा लागला. एवढ्यात जिब्रील (फरिश्ता) प्रेषितांच्या सेवेत हजर झाला आणि म्हणाला, "हे प्रेषित ! ईश्वराने तुम्हाला अन्यायी बनवून पाठविले नाही." आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांनी त्या माणसास तत्काळ बोलावून म्हटले की, 'तुला लागलेल्या बोचकाऱ्याचा तत्काळ बदला घे !" तो उत्तरला की, "हे प्रेषिता ! माझे माता-पिता तुमच्यावर ओवाळतो. मी तुम्हाला क्षमा करीत आहे. मी तुमच्याशी कधीच बदला घेऊ शकत नाही.

आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांच्याकडून रयतेच्या एका सामान्यजणास चुकून बोचकारा लागतो आणि ईश्वर तंबी करतो. मग एका अशा राजाची काय अवस्था असेल की, ज्याच्या राज्यातील जनता राजाच्या अन्याय व अत्याचारास बळी पडली असेल.

हे राजा! आपल्या जिवाची काळजी घ्या आणि यासाठी आपल्या पालनकर्त्या ईश्वराचे अभय मागा. तसेच स्वर्गाची मनोकामना बाळगा. स्वर्गाच्या बाबतीत आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांनी म्हटले की, स्वर्गामध्ये तुमच्यापैकी एखाद्यास एका कमानीएवढी जरी जागा मिळाली तर ती जागा या विश्वापेक्षाही मोठी असेल !

हे राजा! तुमच्यापूर्वी हे राज्य तुमच्या वाडवडिलांकडे होते. आता तुमच्या हाती आले. अर्थात त्यांच्या हातून सुटले. याचप्रमाणे तुमच्याही हातातून सुटेल.

हे राजा! तुम्हाला माहीत आहे काय की, तुमचे पणजोबा माननीय अब्दुल्ला बिन अब्बास (र) दिव्य कुरआनच्या हे कसे ग्रंथ आहे की, यामध्ये लघुत्तम व महत्तम असलेल्यापैकी कोणतीच बाब अशी नाही की जिचा उल्लेख यामध्ये झालेला नाही.'' या आयतीचे स्पष्टीकरण कशा प्रकारे करीत असत? ते म्हणत असत की, लघुत्तम गोष्ट ही स्मीत असून महत्तम ही मोठ्याने हसणे होय. मग विचार करा की, हाताने जे काही घडते व मुखाने जे काही निघते, ते कोणत्या बाबीत गणले जाईल?

हे राजा ! मला उमर बिन खत्ताब (र) यांचे कथन तुम्हास सांगणे आवश्यक वाटते की, ते म्हणत असत, 'फ़रात' नदीवर एक शेळीचे कोकरूदेखील माझ्या गफलतीमुळे दगावले, तर ईश्वर याचा मला जाब विचारील.' मग अशा व्यक्तीची अवस्था काय असेल जिच्या शासनातील जनताच न्यायापासून वंचित आहे.

हे राजा! आपल्या पणजोबा माननीय अब्दुल्लाह बिन अब्बास (र) यांनी दिव्य कुरआनच्या, ''हे दाऊद ! आम्ही तुम्हाला जमिनीवर आपला प्रतिनिधी यासाठी नेमले की, तुम्ही लोकांदरम्यान सत्यावर आधारित न्यायनिवाडे करावेत आणि ईश्वराची मर्जी सोडून आपल्या मर्जी आणि अभिलाषांच्या आधारे निर्णय घेऊ नयेत.''

या आयतीचा अर्थ कशा प्रकारे स्पष्ट केला ? ते या आयतीच्या बाबतीत असे स्पष्टीकरण देत असत की, प्रेषित दाऊद (अ) यांच्यासमोर जेव्हा आपला तंटा मिटविण्यास्तव दोन्ही पक्ष हजर होत असत. या दोन्ही पक्षांपैकी एका पक्षाशी जर त्यांचे जवळचे संबंध असतील, तर आपल्या मनामध्ये किंचितही या गोष्टीचा विचार येऊ देत नसत की, जवळच्या व्यक्तीस झुकते माप देऊन दुसऱ्या पक्षावर अन्याय करावा. कारण ईश्वराचा असाच आदेश आहे की, न्यायासमोर अथवा न्यायदात्या शासकासमोर न्यायदानाप्रसंगी कोणीच लहान अथवा मोठा आणि जवळचा अथवा दूरचा नसतो. तेथे सर्वच समान असावेत. ईश्वराचा प्रेषित दाऊद (अ) यांच्यासह सर्वच शासनकर्त्यांना असा आदेश आहे की, उभय पक्षात न्यायदानाच्या वेळी कोणताही भेदभाव केल्यास आम्ही तुमचे प्रेषितत्व हिसकावून घेऊ व आपल्या प्रतिनिधित्वाच्या पदावरून तुमची उचलबांगडी करण्यात येईल. तसेच ईश्वराने हा आदेश दिला की, 'हे प्रेषित दाऊद (अ) ! आम्ही तुमच्यासह इतर सर्वच प्रेषितांना रयतेचा वाली आणि काळजीवाहू बनविले आहे, जसे की उंटाचा वाली आणि काळजी वाहणारा गुराखी असतो.'' ईश्वरानेच सर्व प्रेषितांना रयतेची व आपल्या अनुयायांची काळजी घेणे व पूर्णपणे देखरेख करणे शिकविले आहे.

हे राजा! तुमच्यावर फारच मोठी जबाबदारी ईश्वराने सोपविली आहे. ही जबाबदारी एवढी महान आहे की, आकाश व पर्वतसुद्धा तिला उचलू शकणार नाहीत. एकदा माननीय उमर

बिन ख़त्ताब (र) यांनी एका मदीनावासीयास जकातीच्या वसुलीकरिता नेमले. काही दिवसांनंतर त्यांच्या लक्षात आले की, वसुलीअधिकारी अद्याप मदीना शहरातच वास्तव्यास आहेत आणि वसुलीकार्य ठप्प पड़लेले आहे. माननीय उमर (र) यांनी त्यांना पाचारण करून जाब विचारला की, "तुम्ही जकात वसुलीकरिता का गेला नाही ? तुम्हाला हे माहिती नाही काय की, या कार्यपूर्तीचे फळ ईशमार्गात प्रयत्न करण्याएवढ़े व धर्मयुद्ध (जिहाद) करण्याएवढेच आहे?" यावर त्यांनी उत्तर दिले की, 'हे उमर! मला माहीत नव्हते.' यावर माननीय उमर (र) म्हणाले, "मला आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांनी सांगितले की, ज्या लोकांवर जनप्रकरणांची जवाबदारी असते त्यांना अंतिम निवाड्याच्या दिवशी नरकाग्नीवरील पुलावर उभे करण्यात येईल. त्यांना उभे करताच पूल हादरू लागेल आणि त्याचबरोबर त्यांचा प्रत्येक अवयव ढीला पडेल. मग त्यास पूर्वावस्थेत आणून त्यांचे परीक्षण करण्यात येईल. जर या परीक्षणात आढळून आले की, त्याने जवाबदारी चांगल्या प्रकारे पार पाडली तर त्यास मोक्ष मिळेल, अन्यथा त्यास मोक्ष मिळणार नाही. "थोड़े थांबून माननीय उमर (र) म्हणाले, 'हे अबू ज़र ! ही जवाबदारी केवढ़ी महान आहे आणि कोणती व्यक्ती अशी आहे की, काटेकोरपणे आपली जबाबदारी पूर्ण करील ?"

"तो माणूस, जो ईश्वरासमोर नतमस्तक होतो." अबू ज़र उत्तरले.

बादशाह अबू जाफर मन्सूर हे सर्व ऐकून ओकसाबोकसी रडू लागला. सोबत गुरुवर्यांचेही डोळे पाणावले. ते परत उपदेश करू लागले,

"हे राजा! तुमचे पणजोबा माननीय अब्बास (र) यांनी आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांना 'मक्का' आणि 'ताईफ़' या दोन ठिकाणच्या राज्यकारभाराची मागणी केली होती. परंतु आदरणीय प्रेषितांनी त्यांना उत्तर दिले की, "हे अब्बास! तुम्ही माझे काका आहात. राज्यकारभारापेक्षा स्वत:ची काळजी वाहिलेलीच बरी. ईश्वराने मला असा आदेश दिला की, आपण आपल्या नातेवाईकांना ईशपरायण करावे. त्यांना ईश्वराचे भय दाखवावे. मी तुमच्या कामी येऊ शकणार नाही. खबरदार! माझे कर्म माझ्या कामी येतील आणि तुमचे कर्म तुमच्या कामी येतील."

माननीय उमर (र) म्हणत की, रयतेची सर्व प्रकारची प्रकरणे केवळ असाच माणूस उत्तम प्रकारे हताळू शकतो की, ज्याची विचारशक्ती आणि अक्कल ठिकाण्यावर आहे. ज्याच्यामध्ये मुत्सद्देगिरी असून जो दिलेली आश्वासने आणि दिलेला शब्द पाळतो. तसेच स्त्रियांसमोर रहस्य उलगडत नसून ईश मार्गदर्शनावर आचरण करण्याच्या बाबतीत कोणाच्याही भल्याबुऱ्या बोलण्याची तमा बाळगत नाही. हे राजा! मुस्लिमप्रमुख चार प्रकारचे असतात. प्रथम प्रकार म्हणजे असा प्रमुख जो शक्तिशाली असतो, तरीदेखील तो आपल्या शक्तीचा गैरवापर करीत नाही. दुराचार व अत्याचार करीत नाही आणि आपल्या राज्यपालांना

दुराचारापासून परावृत्त ठेवतो. असा प्रमुख ईशमार्गात प्रयत्नशील असतो आणि ईश्वराची मदत आणि अनुग्रह त्याच्या सोबत असतो. दुसरा प्रकार हा की, दुराचरणापासून आणि अत्याचार करण्यापासून स्वत:स खूप दूर ठेवतो, परंतु आपल्या राज्यपालांना अन्याय व अत्याचाराची उघड सूट देतो. जसे की बिनवेसनाचा बैल. हा असा मुस्लिमप्रमुख आहे जो विनाशाच्या द्वारावर उभा आहे. ईश्वरानेच त्याला तारले तर ती गोष्ट वेगळी ! तिसरा प्रकार अशा मुस्लिमप्रमुखाचा आहे, जो आपल्या राज्यपालांना तर अत्याचार व दुराचरणापासून रोखतो, परंतु स्वत: मात्र आपल्या अभिलाषा आणि ऐहिक विलासाच्या अधीन असतो. हा असा मुस्लिमप्रमुख आहे ज्याला आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांनी 'अत्याचारी गुराखी'ची उपमा दिली आहे. आदरणीय प्रेषितांनी म्हटले आहे की, तो एकटाच नष्ट होईल आणि चौथ्या प्रकारचा मुस्लिमप्रमुख जो स्वत: देखील आपल्या इच्छा व अभिलाषांच्या अधीन असतो व आपल्या राज्यपालांनासुद्धा उघड सूट देतो आणि हे सर्वच नष्ट होतील.

हे राजन! मला आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांचे एक वचन तुला सांगावेसे वाटते की, 'जिब्रील फरिश्त्याने आदरणीय प्रेषितांच्या सेवेत हजर होऊन म्हटले की, मी आपल्या सेवेत अशा वेळची अवस्था वर्णन करण्यासाठी हजर झालो आहे की, ज्या वेळी ईश्वराने नरकाग्नी भडकावण्याचा आदेश दिला होता. म्हणून नरकाग्नी ज्वलंत करून भडकावण्यात आला, तसेच महाप्रलयापर्यंत तो भड़कत राहील.' यावर आदरणीय प्रेषित म्हणाले, 'हे जिब्रील! त्या आगीचे गुणधर्म मला सांगावे.' यावर जिब्रील उत्तरले, 'ईश्वराने नरकाग्नी भड़कावण्याचा आदेश दिला. एक हजार वर्षापर्यंत तो अतिशय उष्ण होऊन त्याचा रंग लाल झाला. मग परत एक हजार वर्षापर्यंत तो जळत राहिला आणि परिणामी त्याचा रंग काळा पडला. तेव्हा आता अतीउष्ण नरकाग्नीचा रंग पूर्णत: काळा आहे. त्याच्या चिंगाऱ्या चमकतसुद्धा नाहीत. त्या ईश्वराची शपथ, ज्याने आपणास सत्यानिशी पाठविले आहे. नरकाग्नीत टाकण्यात आलेल्या एखाद्या इसमाचा पोषाख जरी भूतलावर दाखविण्यात आला, तर त्याच्या भीतीने सर्वजण मृत्युमुखी पड़तील. तेथील उष्ण व विषारी पेयाचा एक डोल भूतलावरील पाण्यात टाकला, ते कोणीही चाखले तर मृत्यू पावेल. नरकाग्नीच्या साखळदंडाच्या वितभर लाव्हारसाचा तुकडा जरी पर्वतावर पड़ला, तर संपूर्ण पर्वतच त्याच्या उष्णतेने पार वितळून लाव्हारसप्रमाणे वाहून जाईल. एखाद्या माणसास त्यात बुडवून काढल्यास त्याचे विद्रूप स्वरूप पाहून माणूस भयभीत होईल.'' जिब्रील फरिश्त्याने केलेले 'नरकाग्नीचे' भयानक वर्णन ऐकून आदरणीय प्रेषितांना रडू कोसळले. त्यांच्याबरोबर जिब्रील फरिश्त्याला देखील रडु कोसळले.

हे राजन! ईश्वराच्या सत्याची प्रस्थापना हे अतिकठीण कार्य असून ईश्वराजवळ सर्वांत जास्त मोठी प्रामाणिकता ही ईशपरायणता आहे. ज्या माणसाने प्रतिष्ठा आणि प्रभुत्व

ईश्वराच्या आज्ञापालनास्तव ईश्वराकडून मागितली, तर ईश्वर त्याला नक्कीच मान व प्रतिष्ठा देईल. तसेच ज्याने ईश्वराच्या दिलेल्या शासनाधिकार आणि प्रतिष्ठेचा गैरवापर करून लोकांवर अन्याय व अत्याचार केले आणि ईश्वराची अवज्ञा केली, तो नक्कीच अपमानित केला जाईल, धिक्कारला जाईल.

हे राजन! एवढीच माझी शिकवण आहे, जी तुझ्या आणि रयतेच्या भल्याकरिता आहे.

एवढे बोलून वृद्ध महाशय उठून उभे राहतात. अबू ज़ाफर मन्सूर म्हणाला, "कोठे निघालात ?" ते म्हणाले, "आपल्या शहराकडे" अबु जाफ़र बादशाह त्यांना प्रवासखर्चास्तव काही रक्कम देण्याचा आदेश देतो. परंतु ते स्वीकार करीत नाहीत आणि सांगतात, "मला याची गरज नाही. तसेच मी इस्लामची शिकवण पैशांच्या मोबदल्यात विकतसुद्धा नाही.

(२)

कोण होते बरे हे वृद्ध ग्रहस्थ ? हे आहेत 'सीरिया' देशाचे प्रेषितवचन शास्त्राचे प्रसिद्ध विद्‌वान आणि विधीशास्त्राचे तज्ज्ञ... 'अबू अमरुल औजाई (र)' ज्यांच्या ज्ञान व विद्‌वत्तेची वाखाणणी त्यांचे समकालीन विद्धानही करतात. त्यांच्या स्वारीचे लगाम पकडून चालण्याची संधी मिळाल्यास गर्वानि लोकांची छाती फुलते. इमाम इब्ने मेहदी (र) म्हणतात की, प्रेषितवचन शास्त्रीमध्ये शास्त्रप्रमुखाच्या दर्जाचे केवळ चारचजण आहेत, इमाम औज़ाई (र), इमाम मालिक (र), सूरी (र) आणि हम्माद बिन यज़ीद (र) हेच ते चार प्रमुख शास्त्री होत. एकदा सुफ़ियान सूरी (र) आणि इमाम औज़ाई (र) इमाभ मालिक (र) यांच्या सेवेत हजर झाले. तेव्हा इमाम मालिक (र) म्हणाले, "या दोघांपैकी एकजण विद्‌वत्तेमध्ये आपल्या इतर ज्ञानबंधुपेक्षा खूप पुढे आहे, परंतु शास्त्रप्रामुख्यात नाहीत. यांच्यासोबत असलेले इमाम औज़ाई (र) यांना शास्त्रप्रमुखाचा दर्जा देण्याइतपत विद्‌वत्ता लाभलेली आहे." अबू इसहाक़ (र) म्हणतात की, "मी इमाम औज़ाई आणि सुफ़ियान सूरी (र) यांच्यासारखे विद्‌वान पाहिलेच नाहीत. इमाम औज़ाई (र) हे एक जनमाणसांत मिळून मिसळून काम करणारे व्यक्तिमत्त्व आहे आणि सुफियान सूरी (र) हे विशेषजणांत काम करणारे आहेत. मला या दोघांपैकी एकाचे नेतृत्व मान्य करावे लागल्यास मी इमाम औज़ाई (र) यांचे नेतृत्व स्वीकारेन." एकदा हज यात्रेत 'ज़ीतवा' या ठिकाणी इमाम सुफ़ियान सूरी (र) यांची भेट झाली. त्यांनी त्यांच्या उंटाची लगाम हाती घेतली आणि चालु लागले आणि म्हणु लागले की,

"गुरुवर्यांसाठी वाट मोकळी करा." आणि प्रवासीजण त्यांना वाट मोकळी करून देऊ लागले. एकूण परिस्थिती पाहता असे लक्षात येते की, त्यांचे समकालीन असलेली सर्वच विद्‌वान मंडळी त्यांना ज्ञान व शास्त्राचे प्रमुख स्वीकार करतात.

'सीरिया' देशातील सर्वचजण त्यांच्याच धर्मशास्त्राचे अनुकरण करतात. धार्मिक वर्तन व सदाचरणाचे सर्व गुणधर्म त्यांच्यात आढळतात. ईशपरायणता, सत्याची सडेतोड़ भूमिका आणि कोणासमोरही न झुकणारे हे व्यक्तिमत्त्व आहे. आपल्या ईश्वरासमोर रात्रंदिवस एखाद्या याचकाप्रमाणे ते अश्रू ढाळत. ईश्वरकोपाच्या भीतीने त्यांचा आत्मा थर थर कापत असे आणि नेमकी हीच बाब मानवाच्या सदाचरण व सत्यवर्तनाचे मूळ आहे. ईश्वराची महानता हृदयात असल्यावर माणूस इतर कोणापुढेच नतमस्तक होत नाही. मग समोर बादशाह असो वा शासनप्रमुख असो की कोणीही शक्तिशाली व्यक्ती असो.

बादशाह अबू ज़ाफर मन्सूरशी झालेल्या संवादाचे लक्ष्य हेच होते. त्यांनी शासनाधिकाराच्या मस्तीत मस्तावलेल्या बादशाहची सडेतोड़पणे कानउघाडणी केली आणि त्याला सत्याची जाण करून दिली की, असत्य आणि फाजील गर्विष्ठपणा व स्वाभिमानाच्या उन्मादामध्ये आपल्यापेक्षा दुबळ्या रयतेवर अत्याचार करू नये. कारण हे शासन, प्रभुत्व व प्रतिष्ठा तर क्षणिक, कधीही संपणारीच व नष्टप्राय आहे. आज तुम्ही ज्या गोष्टीस प्रतिष्ठा आणि सन्मान समजता, उद्या तीच बाब तुमच्यासाठी अपमान आणि धिक्काराचे कारण सिद्ध होईल. कारण तुम्ही शासनशक्तीच्या बळावर लोकांचे आणि रयतेचे वैध अधिकार हिरावून घेण्यात आपली प्रतिष्ठा समजता, परंतु हेच अत्याचारी वर्तन उद्या तुमचा अपमान आणि धिक्काराचे कारण बनेल. ज्यांच्यावर तुम्ही अत्याचार केले त्यांच्याच हातात उद्या तुमच्या मुसक्या आवळलेल्या असतील. आज तुम्ही त्यांचे जे अधिकार हिरावून घेतले आहेत, जे शासन तुम्ही स्वत:ची जागीर समजून मनसोक्त भोगत आहात, अंतिम निवाड्याच्या दिवशी याच अपराधास्तव नरकाग्नी तुमचा मनसोक्त उपभोग घेईल. तेथे तुम्हाला एकन् एक अत्याचार आणि अन्यायाचा कितीतरी जास्त पटीने हिशेब चुकवावा लागेल. एकन् एक कर्माची शिक्षा भोगावी लागेल. शासन हा काही पोरक्या मुलांचा पोरखेळ नव्हे. ती एक महान जबाबदारी आहे. ही जबाबदारी उचलण्याचे धैर्य कोणीही बुद्धिमान करू शकत नाही. परंतु ही जबाबदारी ज्यांच्या खांद्यावर टाकण्यात आली, त्यांना या जबाबदारीची जाणीव जीवनभर शांत झोपू देत नाही.

या गोष्टी खूपच कडव्या आहेत. कारण सत्य हे नेहमी कडवेच असते. परंतु इमाम औज़ाई (र) यांनी हे अत्यंत कड़वे आणि असहनीय सत्य सडेतोड़पणे बादशाहसमोर पूर्ण धैर्यानिशी मांडले. बादशाहचा प्रमुख सचिव रबीअ हा बादशाहचा विश्वासु आणि निष्ठावंत असतो. इमामसाहेबांचे सत्यबोल त्याला सहन होत नसल्याने त्याची तलवार म्यानाच्या बाहेर येते. येणार कशी नाही. आपल्याविरुद्ध 'ब्र' काढ़णाऱ्याचे शीर धडावेगळे करणे हा तर जणू त्यांचा खेळच होता. परंतु इमामसाहेब सत्य मांडण्यासाठी मृत्युची पर्वा करण्याइतपत भ्याड नव्हतेच मुळी. तसेच सत्यावर आपले प्राण ओवाळून टाकण्याची तर त्यांची तीव्र मनोकामना होती. म्हणूनच तर ते इमाम होते.

बादशाह अबू ज़ाफर मन्सूरची मात्र त्यांच्यावर श्रद्धा आहे. तो त्यांच्या विद्वत्तेची क़दर आणि सन्मान करीत असे. इमाम अवज़ाई (र) यांनी यापूर्वीही अब्बासी शासक 'सफ़ाह'चा काका आणि सीरियाचा राज्यपाल 'अब्दुल्लाह बिन अली' याचीसुद्धा अशीच कानउघाडणी केली होती. हा अब्दुल्लाह तर अतिशय क्रूर, अन्यायी व निर्दयी स्वभावाचा होता. शिवाय तो काळही असा होता की, जेव्हा अब्बासी परिवाराच्या शासकांनी 'बनू उमैया' परिवाराच्या शासनाचा पाड़ाव करून रक्ताची होळी खेळली होती. अब्दुल्लाह बिन अली हा 'बनू उमैया परिवाराच्या समर्थकांच्या मागावरच होता. दिसताक्षणी त्यांना ठार करण्याचा धडाका लावला होता. इमाम औज़ाई (र) हे तर उमैया परिवाराचे खंदे समर्थक होते. खरे पाहता इमाम औज़ाई (र) यांना उमैया शासकांशी काही विशेष सहानुभूती नव्हती. परंतु अब्बासीयांच्या निर्दयी आणि क्रौर्याला ते पसंत करीत नसत. इमामसाहेबांनी स्वत:स लपविण्याचा प्रयत्न केला. परंतु एके दिवशी स्वत:हूनच शासनदरबारी हजर झाले.

अब्दुल्लाह हा आपल्या सिंहासनावर विराजमान होता. त्याच्या हातात भाला होता. त्याच्या आजुबाजूला मानववध करणारे शिपाई हातांमध्ये तलवारी घेऊन उभे होते. इमाम औज़ाई यांनी सिंहासनासमोर येऊन अब्दुल्लाह यास सलाम केला. परंतु अब्दुल्लाह याने त्यांना अत्यंत क्रूर नजरेने पाहिले. त्यांच्या सलामचे उत्तर देण्याऐवजी फरशीवर भाला आपटत म्हणाला,

"औज़ाई ! आम्ही देश आणि राष्ट्राला अत्याचारी व अन्यायी उमैया परिवाराच्या तावड़ीतून सोड़विण्यासाठी त्यांच्याशी युद्ध केले. हे युद्ध तुमच्या दृष्टिकोनानुसार धर्मयुद्ध नव्हे काय?"

इमाम औज़ाई (र) समोर हा प्रश्न अत्यंत कठीण होता. वेळ आणि प्रसंगही खूप नाज़ुक होता. परंतु त्यांनी मोठ्या विद्वत्तेने या प्रश्नाचे अचूक उत्तर दिले,

"मी आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांचे एक वचन तुम्हाला सांगतो की, प्रत्येक कर्माची मदार आणि भिस्त कर्मिकाच्या हेतु व इराद्यावर आहे. प्रत्येक कर्मिकास त्याच्या हेतूनुसार पाप व पुण्याचा मोबदला मिळेल."

इमामसाहेबांचे उत्तर हे दिसायला तर वाईट वाटण्यासारखे नव्हते. परंतु या उत्तरामागील वास्तविक पार्श्वभूमी अत्यंत कडवट आणि असहनीय होती. अर्थातच इमामसाहेबांच्या सांगण्याचे तात्पर्य होते की, तुम्ही रयतेला अन्यायापासून मुक्त करण्यासाठी युद्ध केले नसून केवळ सत्ता बळकावण्याच्या हेतुने युद्ध केले. अर्थातच हे युद्ध धर्मयुद्ध नसून सत्तायुद्ध होय. यदाकदाचित तुमचा हेतु रयतेस अन्याय व अत्याचारापासून मुक्त करण्याचा असता, तर निश्चितच हे युद्ध धर्मयुद्ध असून त्याचे पुण्य तुम्हाला मिळाले असते.

अब्दुल्लाहचा चेहरा तीव्र संतापाने आग ओकत होता. तो आपला भाला जमिनीवर आपटून कडाडला,

"हे औज़ाई ! बनू उमैया परिवाराच्या शासकांचा वध वैध आहे की नाही?"

"हे शासक ! आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांनी म्हटले की, एका मुस्लिमाची हत्या करणे हे केवळ तीन प्रसंगीच वैध ठरते. एकतर त्याने एखाद्यास ठार केले असावे. द्वितीय हे की, विवाहित असून व्यभिचार केला असावा आणि तृतीय हे की त्याने इस्लामभ्रष्ट व्हावे." इमामसाहेब उत्तरले.

अब्दुल्लाहचा राग अनावर होत गेला. तो परत कड़ाड़ला, "उमैया परिवाराच्या संपत्तीबाबत तुमचे काय मत आहे?"

"जर त्यांनी ही संपत्ती अवैधरीत्या मिळविली असेल तर तुमच्या हाती येऊन वैध होणार नाही आणि वैध पद्धतीने मिळविली असेल तर तुम्हीसुद्धा केवळ वैधरीत्याच घ्यावी." इमामसाहेब उत्तरले.

अब्दुल्लाहला काय करावे सुचत नव्हते. त्याच्या तळपायाची आग मस्तकाला भिडली होती. दरबारामध्ये भयाण शांतता पसरली होती. वध करणाऱ्या शिपायांनी आपल्या तलवारी उपसल्या होत्या. इमामसाहेबांना आपल्या वधाचा विश्वास झाला होता. परंतु त्यांच्या चेहऱ्यावर शांत भाव होते. ते अगदी निश्चिंत उभे होते. त्यांची अवस्था पाहून अब्दुल्लाहसुद्धा त्यांना विस्मयाने पाहत राहिला. त्याच्या संतापाचा पारा उतरत गेला. त्याचा संताप शांत होताना पाहून सर्व दरबारीसुद्धा आश्चर्यचकित झाले.

"जर आपली मुख्य न्यायाधीशपदी नेमणूक केली तर तुमची काही हरकत असेल काय?" अब्दुल्लाहने प्रश्न केला. त्याच्या बोलण्यात नम्रता होती. जणू इमामसाहेबांना गळ घालण्याची त्याची ही दुष्ट चाल होती. परंतु त्याची चाल न समजण्याएवढे इमामसाहेब काही कच्च्या बुद्धीचे नव्हते. इमामसाहेबांनी त्याला नकार दिला आणि निघून जाण्यासाठी उठले. ते दरबाराच्या बाहेर निघून जाताना राजाचा शिपाई पाठीमागे आला. इमामसाहेबांना वाटले की, आता आपला वध करण्यासाठीच आला असावा. ते आपल्या स्वारीवरून खाली उतरले आणि शेवटची नमाजासाठी उभे राहिले. इमाम औज़ाई यांची नमाज अदा करून झाल्यावर शिपायांने पैशांची थैली त्यांच्या पुढे केली आणि म्हणाला, "बादशाहने ही रक्कम आपणासाठी पाठविली आहे." इमामसाहेबांनी ती थैली घेऊन रस्त्यातच लोकांना दान करून टाकली.

इमाम औज़ाई (र) हे स्वत:ही परलोकीय ध्यानात मग्न असत आणि इतरांनासुद्धा परलोकाची जाणीव करून देत असत. हकम बिन ग़ीलान यांनी लिहिले की, "मला ही गोष्ट खूप आवडते की, तुम्ही दररोज सकाळ संध्याकाळ परलोकाची आठवण करण्यासाठी थोडा वेळ काढावा आणि याशिवाय कोणतीही लाभदायक बाब आणि गरज तुम्हाला यापासून दूर ठेवू नये."

आणखीन एका पत्रात लिहिले की, "अंतिम निवाड्याच्या दिवशी प्रत्येक मानवास त्याच्या जीवनाचा प्रत्येक क्षण दाखविण्यात येईल. क्षणाव रक्षण आणि दिवसांवर दिवस दाखविण्यात येतील आणि जो क्षण ईशस्मरणाशिवाय आणि ईश्वरास विसरून कंठला जाईल, त्या क्षणाचा मानवास खूप पश्चात्ताप होईल. थोडी कल्पना करा की, त्या वेळी माणसाची काय अवस्था आणि परिस्थिती असेल की जेव्हा क्षणावर क्षण, दिवसांवर दिवस आणि रात्रींवर रात्री अशा तऱ्हेने दाखविण्यात येतील की, त्यामध्ये ईश्वरीय स्मरण आणि परलोकाची तमा बाळगलेली नसेल."

एकदा म्हटले की, "ज्या प्रवचनाचा अथवा भाषणाचा हेतु ईशप्रसन्नता नसतो ते भाषण अथवा प्रवचन प्रेक्षकांच्या अंत:करणास प्रभावीत न करता द्रवरूपी पाण्याप्रमाणे वाहून जाते. (इमाम औज़ाई (र) यांचे हे वचन किती उच्चतम आहे !)

आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) त्यांचे सोबती आणि सोबत्यांचे शिष्यवृंद पाच गोष्टींचे काटेकोरपणे पालन करीत असत. (१) जनसमुदायाशी नेहमी संबंधित असणे, (२) प्रेषित प्रणालीनुसार जीवन जगणे (३) मस्जिदीत उपस्थिती (अर्थात मस्जिदीमध्ये नेहमी नमाज पढ़णे), (४) दिव्य कुरआनचा गंभीरपणे अभ्यास आणि (५) ईशमार्गात प्रयत्न करणे.

एकदा म्हटले की, "रात्रीच्या नमाजीच्या वेळी जे लोक जेवढे दीर्घ कयाम (नमाजीमध्ये उभे राहणे) करतील, अंतिम निवाड्यांच्या दिवशी ईश्वर त्यांना तेवढ्याच लघुकयामची संधी देईल (अर्थात, निवाड्यासाठी जास्त वेळ वाट पाहावी लागणार नाही). दिव्य कुरआनात आहे की,

"रात्रीच्या वेळी ईश्वरदरबारी ते नतमस्तक व्हा आणि रात्रीच्या वेळी दीर्घकाळापर्यंत त्याच्या (ईश्वराच्या) पावित्र्याचे गुणगान करा. हे लोक परलोकमार्गाची शिदोरी सोबत घेणे पसंत करतात. आणि अंतिम निवाड्याच्या महान दिवसाची तयारी करतात."

**प्रकरण दहावे**

# उंच आकाशी झेपणारा पक्षी

## (१)

इमाम सुफ़ियान सूरी (र) यांची प्रवचनसभा चालू होती. त्यांच्या सभोवताली त्यांचे श्रद्धाळु आणि प्रिय शिष्यवृंद बसलेले होते. या ज्ञानसभेत त्यांचे सामान्य शिष्य आणि तत्कालीन मोठमोठे विद्वानसुद्धा होते. एवढ्यात बादशाह अबू जाफर मन्सूरचा राजदूत आला आणि इमामसाहेबांना आदरपूर्वक सलाम करून एक शाही शिक्कामोर्तब असलेले पत्र सादर करून म्हणाला की, 'हि बादशाहने पाठविलेले पत्र आहे." इमामसाहेबांनी बादशाहचे नाव ऐकताच पत्र फेकून दिले आणि म्हणाले, "ईश्वराचे मला अभय असो! मी अशा पत्राला हातसुद्धा लावणार नाही की जे पत्र एका अत्याचारीच्या हाताने लिहिण्यात आले असेल." मग आपल्या एका शिष्यास आदेश देतात की, हे पत्र वाचून दाखवावे.

गुरुच्या आदेशानुसार शिष्य पत्राचा मजकूर वाचून दाखवितो. तो मजकूर खालीलप्रमाणे होता.

"परम दयाळू व कृपाळू ईश्वराच्या नावाने ईश्वराचा दास 'अबू जाफर मन्सूर'कडून आपले धार्मिक बंधु सुफियान सूरी यांना शुभकामना. हे प्रिय बंधु! तुम्हाला ठाऊक आहे की, ईश्वराने संपूर्ण मानवजातीस बंधुत्व संबंधात बांधले आहे. याच बंधुत्वाच्या नात्याने मला तुमच्याशी स्नेह आहे. जर खिलाफ़त (इस्लामी शासन) ची मोहीम माझ्या खांद्यावर नसती तर या स्नेहापायी मी स्वत:च आपल्या सेवेत हजर झालो असतो. ईश्वराने मला प्रतिष्ठेच्या स्थानावर विराजमान केले असून असा कोणीही माणूस नाही की, ज्याने मला या बाबतीत शुभेच्छा दिल्या नसतील. मी सर्वांसाठी शाही खजिण्यांची द्वारे उघडली असून ज्याला जे काही पाहिजे असेल त्याने ते घेऊन जावे. सर्वांनीच माझ्या शाही खजिण्यातून मनमुरादपणे लूट केली. माझी ही दानशूरता आणि पुण्यकर्म माझ्या मनास शांती प्रदान करीत आहे. तरी आपण धनलाभ घेण्यास्तव दरबारापर्यंत येण्याची तसदी मुळीच घेतली नाही. हे संदेशपत्र याच इच्छेस्तव आपल्या सेवेत पाठवित आहे. हे गुरुवर्य अबू उबैद ! आपणास चांगले ठाऊक आहे की, श्रद्धावंताच्या दर्शनाचे पुण्य किती महान आहे. म्हणून पत्र मिळताच भेट घेण्याची त्वरा करावी."

इमामसाहेब पत्राचा मजकूर ऐकत होते आणि त्यांच्या चेहऱ्यावर नाराजीचे भाव उमटत होते. पत्र ऐकून घेतल्यावर इमामसाहेब म्हणाले, "याच पत्राच्या पाठीमागे या अत्याचाऱ्याला लिहावे." प्रेषकवृंद म्हणु लागले की, "गुरुवर्या! हे शाही प्रकरण आहे. पत्राचे उत्तर एखाद्या वेगळ्या कागदावर तरी लिहावे." इमामसाहेब उत्तरले,"मुळीच नव्हे! याच पत्राच्या पाठीमागे उत्तर देण्यात यावे. हे पत्र वैध संपत्तीने तयार केले गेले असेल, तर बादशाह मन्सूरचे डोके

ठिकाणावर येईल अन्यथा याच पत्रासहित तो नरकाग्नीत लोटला जाईल. मी आपल्याजवळ कोणत्याही अशा वस्तुचे अस्तित्व सहन करू शकत नाही जी अन्यायी व अत्याचारीच्या हाताने तयार झालेली आहे. अशा वस्तुमुळे आपला धर्म नष्ट होण्याची संभावना आहे." विचारण्यात येते की, "या पत्राचे काय उत्तर लिहावें?" इमामसाहेब म्हणाले, लिहा !....

परम दयाळू आणि कृपाळू ईश्वराच्या नावाने, ईश्वराचा दास सुफ़ियानकडून अबू जाफर मन्सूर यास कळविण्यात येते की, जे लोक अभिलाषा आणि इच्छा व मनोकामनापूर्तीच्या जाळ्यात फसलेले आहेत, श्रद्धेचा गोडवा त्यांच्याकडून हिरावून घेण्यात आला आहे आणि तो दिव्य कुरआनच्या मार्गदर्शक आदेशांना मुकला आहे, नीट लक्षात घ्या ! मी तुम्हास सडेतोड आणि स्पष्ट शब्दांत बजावत आहे आणि आपल्या दरम्यान जो स्नेहभाव होता, तो संपुष्टात आला आहे. आपले जुणे संबंध आता संपुष्टात आले आहेत. तुम्ही तुमच्या पत्रात स्वत:च ही बाब स्वीकारली आहे की, तुम्ही रयतेच्या कल्याणनिधीतून सर्रास पैशांचा गैरवापर करीत आहात. तुमचे पत्र ज्या लोकांसमोर वाचण्यात आले आहे, जणू ते तुमच्या या स्वीकृत अपराधाचे साक्षीदार ठरले आहेत. उद्या जेव्हा ईश्वरदरबारी तुम्हास हजर करण्यात येईल, तेव्हा हे सर्व तुमच्याविरुद्ध साक्ष देतील. हे बादशाह मन्सूर ! तुम्ही रयतेची संपत्ती नष्ट करीत आहात. तुमचे हे कर्म ईशमार्गात लढणारे योद्धे, गरजवंत, विद्वानमंडळी, विधवा स्त्रिया, अनाथ बालके आणि इतर जनता पसंत करीत आहे काय?

हे मन्सूर! आपले हात रोखा. उद्या तुम्हास ईश्वरदरबारी हजर राहावे लागणार आहे आणि या कर्माचा जाब द्यावा लागणार आहे. विश्वास ठेवा की, ईश्वर महान न्यायी आहे आणि तोच वास्तविक बादशाह आहे. त्याची भीती बाळगा. तुमच्याकडून श्रद्धा आणि त्याग ईश्वराने हिसकावून घेतले आहे. तुमच्याकडून दिव्य कुरआनची शिकवण आणि सदाचाऱ्यांची सोबतसुद्धा हिसकावून घेण्यात आली आहे. शेवटी तुम्ही अत्याचाऱ्यांचेच जीवन निवडले आहे.

हे मन्सूर ! तुम्ही शाही सिंहासनावर विराजमान आहात. उच्चतम सुखवस्तु उपभोगत आहात. द्वारावर नक्शी व उंची वस्त्रांचे पडदे तुम्ही लावले आहेत. क्रूर शिपाई तुमच्या दरबारी वावरत आहेत. ते निराधार जनतेवर नाना अत्याचार करीत आहेत. परंतु कोणीच त्या अत्याचारपीडितांची दाद ऐकायला तयार नाही. तुमचे लोक जनतेला तर दारु पिण्याच्या अपराधास्तव शिक्षा देतात, परंतु स्वत: मात्र दारु पितात. व्यभिचाऱ्यांना शिक्षा देतात, परंतु स्वत: मात्र व्यभिचार करतात. चोरांचे हात कापतात व स्वत: मात्र चोऱ्या करतात. खुन्याला शिक्षा देतात आणि स्वत: मात्र रक्तपात करीत असतात. ईश्वराची निर्मिती असलेली दुर्बल रयत तुमच्या क्रूर कर्मांनी पार वैतागून गेली आहे. याची तुम्हाला कसलीच चिंता नाही. जे लोक स्वत:स वाचवू इच्छितात, त्यांना देखील तुम्ही आपल्या कुकर्मांमध्ये ओढतात. मला तुमच्या धनदानाची आणि मेहेरबानीची काहीही गरज नाही आणि तसेच तुमच्याशी काहीही संबंध ठेवण्याची गरज नाही."

(२)

कोण आहेत बरे हे सुफ़ियान सूरी? ज्यांनी बादशाह अबू जाफ़र मन्सूरचे निमंत्रण स्वीकारले नाही? खरे पाहता हाच तो मन्सूर होता जो बादशाह होण्यापूर्वी सुफियान सूरी यांचा मित्र होता. इतिहास साक्षी आहे की, ज्या ज्या वेळी एखादा माणूस भाग्यवश बादशाह झाला तर त्याच्या द्वारी लोकांच्या रांगा लागतात. दूरदूरचे लोक त्याचे मित्र होण्याचा दावा करतात. त्याच्यासमोर लाळघोटेपणा करतात. त्याच्यासमोर नतमस्तक होतात. त्याने सांगितलेली असत्य बाब सत्य सिद्ध करण्याचा प्रयत्न करतात, जेणेकरून बादशाहच्या कृपादृष्टीचा एक कटाक्ष आपल्यावर पडून आपले भले होईल. परंतु या ठिकाणी अतिशय विलक्षण परिस्थिती आहे. सुफियान सुरी आपला मित्र बादशाह झाल्यावर त्याच्याशी असलेले जुने स्नेहसंबंध संपुष्टात आणतात. हा जुना स्नेही मित्र बादशाह झाल्यावर आपल्या खजिण्याचे द्‌वार सर्वांसाठी उघडे करतो. लोक मनसोक्तपणे संपत्तीची लयलूट करतात. बादशाह मन्सूर वाट पाहात असतो की, आपले जुने आणि विद्‌वान असलेले मित्र सुफ़ियान सूरीसुद्धा यावेत आणि त्यांनीसुद्धा शाही खजिन्यातून धनलाभ घ्यावा. सिंहासनावर विराजमान होण्याच्या मला शुभेच्छा द्याव्यात आणि वाटेल तेवढे घेऊन जावे. परंतु त्यांची वाट पाहून जेव्हा तो निराश होतो, तेव्हा त्यांना पत्र पाठवून आमंत्रण देतो. परंतु इमाम सुफ़ियान सूरी अत्यंत निस्पृहतेने त्याचे निमंत्रण धुडकावतात. त्याची कठोर शब्दांत कानउघाडणी करतात की, ज्या प्रतिष्ठित स्थानावर तुम्ही बसलेले आहात आणि सत्तेच्या उन्मादात मस्त आहात, ती एक महानतम जबाबदारी आहे. उद्या अंतिम निवाड्याच्या दिवशी तुम्हाला आपल्या रयतेच्या निगराणीच्या बाबतीत असलेल्या एकन् एक कर्तव्याचा ईश्वरासमोर जाब द्यावा लागेल. तुम्ही ज्या चुकीच्या शासनव्यवस्थेची धुरा सांभाळली आहे, त्याचा आनंद गगनात मावेनासा तुम्हाला वाटत आहे. परंतु या सामर्थ्य-शक्तीचा गैरवापर करून तुमच्या हातून जी काही कुकर्मे घडत आहेत त्यांचा तुम्हाला हिशेब द्यावाच लागणार. ज्या खजिण्याचे दृवार उघडून तुम्ही स्वत:स दानशूर म्हणवून घेण्यात धन्य समजता त्या खजिण्याच्या संपत्तीची एक कवडीसुद्धा तुमची जागीर नसून जनतेची अनामत आणि ठेव आहे. तिचा हिशेब तुम्हास चुकता करावाच लागेल.

तर मग कोण आहेत बरे हे सुफ़ियान सूरी? हे आपल्या काळातील अतिशय महान आणि थोर प्रेषितवचन शास्त्राचे प्रगल्भ विद्‌वान आणि आपल्या ज्ञानानुसार काटेकोरपणे आचरण करणारे सदाचारी. त्यांच्या ज्ञान व सदाचरणाच्या प्रखर प्रकाशामुळे अज्ञानाचे आणि दुराचरणाचे तीव्र तिमिर पार नष्ट झाले. इमाम मालिक म्हणतात की, "पूर्वी इराकमध्ये पैसाअडका आणि वस्त्रांची चंगळ होती. जेव्हा सुफ़ियान सूरी यांचे आगमन झाले तेव्हा ज्ञान व संशोधनाची चंगळ झाली. हे एवढे महान व्यक्तिमत्त्व होते की, त्यांचे समकालीन सर्वच विद्‌वान

त्यांच्या विचारशक्तीने प्रभावीत झालेले दिसतात आणि हेच समकालीन विद्वान नंतरच्या काळात इमाम अहमद बिन हम्बल यांच्यासारख्या महान प्रेषितवचनशास्त्र तज्ज्ञ आणि थोर विधिज्ञाच्या नावाने ओळखले जाऊ लागले.

सुफ़ियान सूरी यांनी बादशाहला दिलेले पत्राचे उत्तर निश्चितच संताप आणण्यासारखे होते. पत्राचे उत्तर वाचून तो अतिशय क्षुब्ध होतो. परंतु राज्य शासनाचा कारभार चालविण्याची तत्त्वे आणि नीतीमुळे नाइलाजास्तव आपला संताप आवरतो. अब्बासी परिवाराचे राज्य नुकतेच स्थापन झाले होते. त्यांना आपले शासन स्थिर आणि अबाधित ठेवण्यास्तव सर्वसामान्य जनतेस खुश ठेवण्याकरिता राज्यातील विद्वान मंडळींची मर्जी राखणे गरजेचे होते. या धर्मशास्त्री आणि विद्वानांच्या मदतीची राज्याच्या स्थैर्यासाठी नितांत आवश्यकता होती. कारण या धर्मशास्त्रींचा सामान्य जनतेवर खूप जास्त प्रभाव होता. त्यांचा राग ओढवून घेणे राज्यास परवडणारे मुळीच नव्हते.

बादशाहने सुफियान सूरी यांना जे पत्र लिहिले होते, त्यामागे हेच राजकारण प्रेरित होते. सुफ़ियान सूरी जनतेचे एक अतिप्रतिष्ठित, विशेष धर्मगुरू आणि संशोधन बुद्धीचे विद्वान होते. बादशाह अबू जाफर मन्सूर आणि त्यानंतरचा भावी बादशाह व राजकुमार मेहदी अब्बास त्यांचा राज्य स्थैर्याकरिता वापर करून घेऊ इच्छित होते. परंतु सुफ़ियान सूरी यांनी या बापलेकांना कधीच आपल्या ध्येयात यशस्वी होऊ दिले नाही. ते या दोघांपासून नेहमीच दूरदूर राहिले. या बादशाहांनी त्यांना निरनिराळी प्रलोभने दाखविली. मोठमोठे हुद्दे देण्याचे आमिष दाखविले, परंतु सुफ़ियान सूरी त्यांच्या जाळ्यात अडकू शकले नाहीत. काळ लोटत होता आणि बादशाह मन्सूरचे प्रयत्न वाढत होते, परंतु सुफ़ियान सूरी खूपच कठोर स्वभावी होत होते. एकदा अबू जाफर मन्सूरची हजच्या काळात मस्जिदे हराममध्ये सूफ़ियान सूरी यांच्याशी अचानक भेट होते. बादशाह अबू जाफ़र मन्सूर सुफ़ियान सूरी यांच्या खांद्याला धरून क़िबल्याकडे (बैतुल्लाह अर्थात ईश्वराचे घर) तोंड वळवितो आणि म्हणतो की, ''शपथ आहे या इमारतीच्या निर्मात्या ईश्वराची की तुम्ही हे सांगा की, मी कसा माणूस आहे?'' ''ईश्वराची शपथ की, तू अतिशय नीच माणूस आहे !'' क्षणाचाही विलंब न करता सुफ़ियान सूरी ताड़कन उत्तरले.

एकदा बादशाह मन्सूरने 'कूफा' शहराच्या राज्यपालास एका पत्राद्वारे लिहिले की, 'सुफ़ियान सूरी' यांनी सरन्यायाधीशपदाचा स्वीकार करावा. ते वेडसरपणे बोलत सुटतात आणि संधी साधून पळून जातात आणि शेवटी मक्कामध्ये आश्रय घेतात. यावर मन्सूरचा संताप अनावर होतो आणि तो त्यांना ठार करण्याचा निश्चय करतो. तो हजला जातो आणि आदेश देतो की, मस्जिदीच्या बाहेर वधशीला स्थापावी. त्याला माहिती मिळते की, सुफ़ियान सूरी मस्जिदमध्ये पहुडलेले आहेत. 'फ़ुज़ैल बिन अयाज़' यांच्या मांडीवर डोके आहे आणि

'ऐनिया' यांच्या मांडीवर त्यांचे पाय आहेत. बादशाहच्या दुष्ट हेतुची या दोघांना कल्पना येते आणि ते मनोमन प्रार्थना करतात की, 'ईश्वर दुष्ट बादशाह मन्सूरला मस्जिदीमध्ये येऊ देऊ नकोस.' मग ते दोघे उठतात आणि काबे शरीफ़च्या पडद्यांना पकडून प्रार्थना करतात की, "ईश्वर ! आम्हास बादशाह मन्सूरच्या अन्यायपासून मुक्ती दे." ईश्वरदरबारी त्यांची प्रार्थना स्वीकार होते आणि बादशाह मन्सूर रस्त्यातच आजारी पडतो आणि मरण पावतो. त्याचा मृतदेह मक्का शहरी पोहोचविण्यात येतो.

बादशाह मन्सूरनंतर राजकुमार मेहदी पित्याच्या राजसिंहासनावर बसला. त्याने इमामसाहेबांच्या अटकेचे आदेश दिले. सुफ़ियान सूरी यांना अटक करून आणण्यात येते. सर्वांच्या नजरा त्यांच्यावर खिळलेल्या आहेत. त्यांच्या चालण्यामध्ये ज्ञानात्मक प्रतिष्ठा आणि विनय झळकत होता. दरबारात दाखल होताच त्यांनी शाही नियम न पाळता मोठ्या आवाजात म्हणाले,

"अस्सलामु अलैकुम ! (ईश्वराचे तुला अभय असो !)" बादशाह मेहदी त्यांच्या स्वागतास्तव सिंहासनावरून उठून उभा राहिला आणि दोन पाऊले पुढे येऊन भेट घेतली. त्यांना आपल्या सिंहासनावरच बाजूला बसविले. मग म्हणाला, "हे गुरुवर्य सुफ़ियान ! तुम्ही नेहमीच आमच्यापासून दूर दूर राहात असता. तुम्ही आमच्या हातून कसे वाचू शकता ? आपणास भीती बाळगण्याचे काहीच कारण नाही. असे होता कामा नये की, तुम्ही स्वाभिमानापोटी एखादे विक्षिप्त कृत्य करून बसावे." इमामसाहेबांच्या चेहऱ्यावरील भाव जशास तसे होते. त्याच्या धमकीवजा शब्दांचा त्यांच्यावर काहीच परिणाम दिसत नव्हता. त्यांनी त्याच्या बोलण्याचे उत्तर अत्यंत निस्पृहतेने दिले. "होय ! तुम्ही वाट्टेल ते करू शकता ! परंतु हे विसरता कामा नये की, एक अत्यंत महान आणि सामर्थ्यशील न्यायदाता (ईश्वर) सुद्धा आहे, जो सत्य आणि असत्यादरम्यान निश्चितच निर्णय करील." त्यांच्या पाठीमागेच बादशाहचा विशेष सचिव 'रबी हाजिब' हा हातात नंगी तलवार घेऊन उभा होता. इमामसाहेबांच्या उत्तरावर त्याच्या अंगाचा तिळपापड झाला आणि बादशाहास उद्देशून म्हणाला, 'हे आक़ा (स्वामी) ! आदेश असेल तर या थेरड्याचा शीरच्छेद करू का? या म्हाताऱ्यास शाही दरबारात बोलण्याचे शिष्टाचार देखील माहीत नाहीत." 'हे दळभद्र्या ! गुपचूप बस. यासारखे लोक हेच तर इच्छितात की, आपण यांना ठार करावे आणि लोकांनी आपणास अभागे म्हणावे." बादशाह मेहदीने त्यास दरडावले. मग सुफ़ियान सूरी यांच्याकडे वळून म्हणाला, "आपणास 'कूफ़ा' शहराचे न्यायाधीशपद स्वीकारावेच लागेल. आम्ही आपणास संपूर्ण अधिकार बहाल करतो. तुमच्या कार्यपद्धतीत कोणतीच राजकीय ढवळाढवळ होणार नाही. आपल्या निर्णयाविरुद्ध अपील केली जाणार नाही." एवढे बोलून बादशाह मेहदीने त्यांना न्यायाधीशपदाचे नियुक्तीपत्र देण्याचा आदेश दिला. सुफ़ियान सूरी ते

नियुक्तीपत्र घेऊन दरबाराच्या बाहेर पडले आणि नियुक्तीपत्र हजला नदीत झोकून अज्ञातवासात निघून गेले. एकदा 'हज'च्या हंगामामध्ये त्यांची बादशाह मेहंदीशी अशा अवस्थेत भेट होते की, काहीजण त्याची खूप प्रशंसा करीत होते. सुफ़ियान सूरी यांना राहावले नाही. ते बादशाह मेहदीला म्हणाले, ''इस्लामी शासनाचे दुसऱ्या क्रमांकाचे शासक माननीय उमर बिन खत्ताब (र) यांनीसुद्धा हज केला आणि ते देखील केवळ सतरा दिनार (तत्कालीन चलन) एवढेच खर्च केले आणि तू तर या भाटांवर आणि आपल्या चंगळवादावर पूर्ण शाही खजिनाच खर्च करून टाकलास.'' एक तर ही गोष्टच बादशाह मेहदीला खूप बोचणारी होती आणि आणखीन जास्त हे की, अशा प्रसंगी सांगण्यात आली की, चारचौघांमध्ये आणि तेसुद्धा हजच्या प्रसंगी! बादशाह मेहदीच्या संतापास पारावार उरला नाही आणि सुफ़ियान सूरी हजारो माणसांच्या गर्दीमध्ये लोप पावले. सुफ़ियान सूरी हे केवळ शासकांसमोरच नव्हे तर जनतेसमोरसुद्धा सडेतोडपणे सत्य मांडत असत. त्याची प्रवचननीतीच अशी असायची की, ते जेव्हा सीरियामध्ये असत, तेव्हा माननीय अली (र) यांचे कौतुक करीत. त्यांना याची पर्वाच नव्हती की, त्या ठिकाणी कोणीही माननीय अलींचे समर्थक नसून विरोधक आहेत. तसेच इराक़मध्ये असताना माननीय उस्मान (र) यांचे कौतुक आणि गुणगान करीत आणि याची मुळीच काळजी करीत नसत की, इराक़मध्ये सर्वचजण माननीय उस्मान यांचे विरोधक आहेत. ते कोणाच्याही समर्थन अथवा विरोधभावनेस न जुमानता सडेतोडपणे लोकांसमोर सत्य गोष्ट मांडत असत. 'कूफ़ा'मध्ये असताना माननीय अबू बकर आणि उमर (र) यांचे कौतुक करीत असत.

(३)

ही आहे या महापुरुषाची कणखर आणि सडेतोड़ भूमिका याच सडेतोड़ भूमिकेमुळे आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांची कित्येक वचने जशास तशी आपल्यापर्यंत पोहोचली. सुफ़ियान सूरी यांच्याप्रमाणेच इतर विद्वान व प्रेषितवचन शास्त्रज्ञांचीसुद्धा अशीच कणखर भूमिका इतिहासात पाहावयास मिळते. त्यांनी शासकांच्या दड़पणांना भीक न घालता आणि त्यांच्या प्रलोभनांना बळी न पडता धर्मज्ञानाची आणि सदाचरणांच्या विधींची काटेकोरपणे जोपासना केली. वेळ प्रसंगी त्यांनी आपल्या प्राणाचे बलिदान देऊन धर्मरक्षणाची कर्तव्यनिष्ठा सिद्ध केली. एवढेच नव्हे तर त्यांनी असे शिष्य तयार केले की त्यांनीसुद्धा धर्मरक्षणात आपल्या गुरुंची जीवनपद्धती स्वीकारली. आपल्या शिष्यवृंदांना ते नेहमीच सांगत असत की, त्यांनी लोकांच्या शक्ती व सामर्थ्याने प्रभावीत न होता सत्य मांडावे, सत्यावरच आचरण करावे आणि ते जोपासावे. एकदा सुफ़ियान सूरी यांनी त्यांच्या एका शिष्याला लिहून पाठविले की,

''तुम्ही ज्या काळात जीवन जगत आहात तो काळ अत्यंत कठीण आणि अरेरावीचा आहे. प्रेषित मुहम्मद (स) यांच्या सोबत्यांनीसुद्धा ईशदरबारी प्रार्थना केली होती की, हे ईश्वरा!

आम्हास त्या काळापासून अभय दे. खरे पाहता त्यांच्यात सदाचरणाची एवढी कणखरता होती जी आपल्यात नाही. पुण्यकर्मांच्या बाबतीत आपली ही अवस्था आहे की, आपल्यामध्ये ज्ञानाचा, धैर्याचा आणि संयमाचा अभाव आहे. चांगल्या आणि उत्तम सोबती व सवंगड्यांची कमी आहे. त्यातल्यात्यात उपद्रव माजलेला आहे आणि आपण ऐहिक जीवनाच्या अरेरावीत अडकलो आहोत. मग अशा अरेरावीच्या काळात आपण शासनकर्त्यांच्या जवळही फटकू नये. कारण यामुळे आपण धर्मभ्रष्ट होण्याची आणि आपल्या जबाबदाऱ्यांपासून परावृत्त होण्याचीच जास्त संभावना आहे. या जबाबदाऱ्या ईश्वर आणि प्रेषित मुहम्मद (स) यांच्याकडून आपल्याला मिळालेल्या आहेत. म्हणून स्वत:स नष्ट करण्यापेक्षा अज्ञातवासाचे जीवन जगणे फायद्याचे होईल. खबरदार ! श्रीमंताच्या आणि पैशांचा माज चढलेल्यांच्या जवळही फटकत जाऊ नका. शासनकर्त्यांच्या दबाव आणि आमिषांना बळी पडू नका. शासन आणि राजकारणासाठी ते लोक वाटेल ते करीत असतात. सत्तेची जादुई माया त्यांना सत्यापेक्षाही जास्त प्रिय आहे.''

एकदा त्यांच्या सेवेत एक सरकारी कर्मचारी हजर झाला. इमामसाहेबांनी त्यास प्रवचनसभेत बसण्याची परवानगी न देता इतर ठिकाणी बसण्यास सांगितले. यावर तो म्हणाला की, 'गुरुवर्य, सरकारी नोकरी सोडून कसे चालेल. शेवटी माझ्यावर मुलांबाळांची जबाबदारी आहे.''

शिष्यवर्गाला उद्देशून इमामसाहिब म्हणाले, ''या माणसास पाहता? हा काय बोलतो ते ऐकता ना? हा म्हणतो की, त्याने ईश्वराची अवज्ञा केली तर त्याचे आणि त्याच्या मुलाबाळांचे पोट भरेल. ईश्वर त्यांना उपजीविका प्रदान करेल. उलट ईश्वराची आज्ञा पाळल्यास तो आणि त्याचे कुटुंब नष्ट होईल. शिष्यांनो! कधीही कोणत्याच परिवारप्रेमी माणसाचे अनुकरण करू नका. परिवार पालनाकरिता अशा प्रकारचा माणूस वैध आणि निषिद्ध तसेच सत्य आणि असत्यात भेद पाळत नसतो. त्यांना केवळ एवढेच निमित्त मिळते की, मुलांबाळांचे आणि कुटूंबीयांचे पालनपोषण करणेसुद्धा आवश्यक आहे.''

एकदा एकाने विचारले की, 'आपण शासनाधिकाऱ्यांपासून एवढे दूरदूर का असता? तुम्ही त्यांच्या जवळ राहिल्यास त्यांना तुम्ही अन्याय व अत्याचारापासून परावृत्त ठेवू शकता. त्यांना धर्म, सद्वर्तन आणि सदाचाराची शिकवण देऊ शकता आणि वाईट कर्मापासून रोखू शकता.''

यावर सुफियान सूरी म्हणाले,

''तुम्ही मला अशी सूचना करता की, मी पाण्यातूनही चालावे आणि पायही भिजू देऊ नये. मला शंका वाटते की, ते माझा आदर-सत्कार करून माझे मनपरिवर्तन करण्याचे प्रयत्न करतील. त्यांचा आदर-सन्मान पाहून कदाचित माझे मतसुद्धा वळेल आणि मग माझे सदाचरण कदाचित भ्रष्टही होतील.''

आता आपण या धर्मशास्त्र्याच्या मौलिक प्रवचनांचा लाभ घेऊ या. ते म्हणत असत,

"ज्ञान मिळवावे आणि मिळविलेले ज्ञान चेष्टा-मस्करी आणि वाह्यात गप्पा-गोष्टींमध्ये वाया घालवू नये. असे केल्याने मानवी हृदय जुन्या इमारतीप्रमाणे खंडर होते. एखाद्या माणसाला प्रेषित मुहम्मद (स) यांच्या आचरण पद्धती व्यतिरिक्त गोष्टींवर आचरण करताना पाहिल्यास त्याचा उल्लेख आपल्या जवळच्या मित्रांजवळसुद्धा करता कामा नये, तसेच आपल्या अंतकरणातही त्यास जागा देता कामा नये.

धर्मपंडित तीन प्रकारचे असतात. प्रथम प्रकारचे धर्मपंडित हे ईश्वरास जास्त ओळखणारे असतात. त्याच्या आदेशांचे ज्ञान त्यांना असते. ईश्वराची मर्जी आणि इच्छा ओळखण्यात ते तरबेज असतात. त्यांची ओळख ही की, ते नेहमीच ईश्वराचे भय बाळगतात. ईश्वराच्या भयाने त्यांचा आत्मा थरथर कापतो. ईश्वराच्या मर्यादांचे उल्लंघन ते कधीच करीत नाहीत. द्वितीय प्रकारचे विद्वान हे ईश्वरास ओळखणारे तर असतात, परंतु त्याच्या मर्यादा पाळत नाहीत. त्यांची ओळख अशी आहे की, ते ईश्वराला घाबरतात, परंतु ईशमर्यादांची अवज्ञा करतात. तिसऱ्या प्रकारचे धर्मपंडित हे ईश्वरालाही ओळखत नाहीत आणि ईश्वरीय मर्यादासुद्धा पाळत नाहीत. या तिसऱ्या प्रकारच्याच धर्मपंडितांना नरकाग्नीचे इंधन बनविले जाईल.

नमाजच्या वेळी पोलिस शिपाई झोपलेला असेल तर त्याला झोपेतून जागवू नका. कारण तो जर उठला तर लोकांना त्रास देईल. म्हणून त्याने झोपलेलेच बरे."

एकदा प्रश्नकर्त्याने त्यांना विचारले, "अरबी भाषेत 'गोगा' (नीच आणि विद्रुप) कोणास म्हटले गेले?"

"जो माणूस धर्मज्ञानाच्या माध्यमाने ऐहिक सुख मिळवित असतो. धर्मज्ञानीच जर दुराचारी झाले तर त्यांच्यात सुधारणा कोण करील ? आणि धर्मज्ञानींचा दुराचार हा आहे की, ते धर्म विकून भौतिक सुख खरेदी करतात." इमामसाहेबांनी उत्तर दिले.

एकदा इमाम सुफ़ियान सूरी यांच्या सेवेत एक माणूस हजर होऊन म्हणाला, "एक माणूस बादशाह मेहदीकडे नेहमीच ये-जा करीत असतो आणि म्हणतो की, मी त्याचे अनुकरण मुळीच करीत नाही. मी त्याच्या दुराचरणांपासून अलिप्त आहे." यावर इमामसाहेब उत्तरले की, "तो असत्य बोलत आहे. त्या माणसाने बादशाहचा शाही थाट पाहिला नाही काय? त्याच्या अन्नसेवन आणि पोषाखात अनावश्यक खर्च त्याला दिसत नाही काय? मग एवढा सर्व अन्याय पाहून त्याने बादशाहला हे सांगण्याचे धैर्य केले काय की, हे शाही आणि फाजील अभिमानाचे जीवन राजा असून तुम्हाला शोभत नाही?"

अली बिनुल हसन यांची इमामसाहेबांवर खूप श्रद्धा होती. इमामसाहेब त्यांना अशा

सूचना करीत की, त्यांचे पालन केल्यास जीवनात क्रांती घडून येईल आणि सत्य धर्माच्या शरीरास संजीवनी प्रदान होईल. एकदा इमामसाहेब त्यांना म्हणाले,

"प्रेषितप्रणाली शास्त्राचे दोन प्रकार आहेत. पहिला प्रकार असा आहे की, ज्यावर आचरण करणे मार्गदर्शन मिळणे आणि सोडून देणे म्हणजे मार्गभ्रष्ट होणे होय. दुसरा प्रकार म्हणजे, ज्यावर आचरण करणे हे मार्गदर्शन मिळणे आणि सोडून दिल्यास मार्गभ्रष्टता नव्हे. जोपर्यंत ईश्वराने अनिवार्य केलेली पुण्यकर्मे करण्यात येत नाहीत, तोपर्यंत ईश्वर ऐच्छिक पुण्यकर्माचा स्वीकार करीत नाही. रात्रीच्या वेळेची उपासना दिवसा केली तर स्वीकृत होत नाही आणि दिवसाच्या वेळी अनिवार्य केलेल्या उपासना रात्री पूर्ण केल्यास स्वीकृत होत नाहीत. अंतिम निवाड्याच्या दिवशी मानवाचा हिशोब अनिवार्य करण्यात आलेल्या उपासनांपासून सुरू करण्यात येईल. जर त्याने अनिवार्य उपासना पूर्ण केल्या असतील त्याच्या ऐच्छिक उपासनासुद्धा स्वीकारल्या जातील. आणि अनिवार्य उपासनांमध्ये खोट निघाल्यास ऐच्छिक उपासनाच्या स्वीकृतींची भीस्त ईश्वराच्या कृपेवरच आहे. सर्वांत मोठी अनिवार्य उपासना ही आहे की, मानवाने निषिद्ध आणि अन्यायपूर्ण कर्मांपासून दूर राहावे. ईश्वराने दिव्य कुरआनात म्हटले आहे की,

"ईश्वर तुम्हाला आदेश देतो की, आपल्या अनामती अशा लोकांच्या स्वाधीन करा, जे त्यांचे रक्षण करण्यात समर्थ आहेत."

हे बांधवांनो ! ईशपरायणता अंगीकारा, सत्य भाष्य, निर्मळ आणि प्रामाणिक हेतु आणि सद्‌वर्तन स्वीकारा. नीट लक्षात ठेवा की, तुम्ही जरी ईश्वरास पाहत नसाल तरी ईश्वर तुम्हाला पाहत आहे. तुम्ही जेथे असता, तो तुमच्या सोबतच असतो. ईश्वराबरोबर चाल चलू नका, अन्यथा तो तुमच्याबरोबर चाल खेळणार. कारण जो माणूस ईश्वराशी खेळी खेळतो, ईश्वरदेखील त्याचे उत्तर खेळीनेच देतो. तसेच त्याची श्रध्दा, भावना आणि जीवनात्मा अशा प्रकारे हिरावून घेतो की, ज्याचा त्याला मागमूसही लागत नाही. त्याचप्रमाणे मुस्लिम आणि मुस्लिमेतरांशी दगा करू नका, कारण असली दगाबाजी त्याच्यावरच उलटते. आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांनी म्हटले आहे की, 'जो माणूस दगाबाजी करतो, तो आमच्यापैकी मुळीच नाही.'

कोणाशीही दगा केला अथवा खेळी खेळली तर तुमच्या स्वभावात दांभिकता निर्माण होईल. कोणाचाही द्वेष बाळगू नका आणि निंदा करू नका. यामुळे तुमचे सर्वच कर्म नष्ट होतील.

आपले ऐहिक जीवन परलोकी जीवनाच्या मोबदल्यात विका. यामुळे ऐहिक आणि पारलौकिक या दोन्ही जगात तुमचा मोठा लाभ होईल. या उलट ऐहिक जीवनाचे सुख मिळविण्यासाठी पारलौकिक सुख विकल्यास दोन्ही जगात असहनीय नुकसान उचलावे लागेल."

**प्रकरण अकरावे**

# प्रेषितवचन शास्त्राचा तज्ज्ञ

हारुन रशीद बादशाहने विचारले की, "इजिप्त देशाची समृद्धी कोणत्या गोष्टीवर अवलंबून आहे?" ते उत्तरले की, "नाईल नदीच्या खळखळत्या पाण्यावर आणि शासनाधिकाऱ्यांच्या ईशपरायणतेवर."

(१)

हा कोण आहे ज्यांच्या आगमनावर इजिप्तमध्ये आनंद व हर्षाचे वातावरण निर्माण झाले. त्याच्या स्वागतप्रित्यर्थ विविध स्वागत आणि जल्लोषसभा घेण्यात येत आहेत. हा आहे आपल्या काळाचा महान आणि प्रसिद्ध कवी 'अम्मार बिन मन्सूर'. लोकांमध्ये त्याच्या कवन शक्तीची खूप प्रसिद्धी असून आता त्याच्या मुखाने त्याचे काव्य ऐकण्याची प्रचंड उत्सुकता आहे. या काळामध्ये शासनाधिकाऱ्यांची स्तुती आणि प्रशंसा मिळविणे हेच एका कवीचे अंतिम ध्येय आणि लक्ष्य समजले जात असे. शासकांच्या प्रशंसा आणि स्तुतीमध्ये जवळपास सर्वच कवी भाटाप्रमाणे खोट्या स्तुतींचे ढीग रचत असत आणि याच्या मोबदल्यात शासनाकडून आपल्या तिजोऱ्या भरत असत. शासकांशी प्रस्थापित केलेल्या संबंधांना कवीवर्ग आपली शान आणि प्रतिष्ठा समजत असत. त्यांच्या प्रशंसेत तयार करण्यात आलेल्या कविता प्रथम सुशिक्षित वर्गात आणि मग सामान्य जनतेत प्रसिद्धी पावत असत. अशा प्रकारे संपूर्ण समाजाचे सदाचरण अशा प्रकारच्या काव्यामुळे गढूळ होऊन जाते. या खोट्या स्तुतींवर आणि शासकांच्या लाळघोटेपणावर आधारित असलेले कवन केवळ जनसभांपुरतेच मर्यादित न राहता ते मशिदींमध्येसुद्धा दाखल होण्याची नामुष्की इतिहासाला सहन करावी लागली. कवी आणि सरकारी भाट बिनधास्तपणे मस्जिदीच्या प्रवचनासनावरून ईशस्तवनऐवजी राजाच्या स्तुतीपूर्ण काव्याने मस्जिदीचे पावित्र्य भ्रष्ट करीत असत. त्यांना रोखण्याचे कोणातही धैर्य होत नसे.

दवंडीचा आवाज वाढत होता. गल्लीबोळांमध्ये दवंडी देऊन जनतेस सुचित करण्यात येत होते की, अम्मार बिन मन्सूर शहराच्या प्रमुख मस्जिदीमध्ये आपल्या कविता प्रेक्षकांच्या सेवेत सादर करणार आहे. त्याच्या कविता ऐकण्यासाठी मस्जिदींमध्ये जनसागर उसळला. अम्मारने बादशाहच्या प्रशंसेमध्ये एक लांबलचक काव्य प्रेक्षकांना ऐकविले आणि लोकांची खूप वाहवा मिळविली. संमेलन समाप्त झाले आणि त्याचे चाहते त्याचा घेराव करून त्यास शुभेच्छा देऊ लागले. एवढ्यात दोघे येऊन त्यास कळवितात की, 'इमाम लैस बिन साअद (र) (जन्म ९४ हिजरी सन व मृत्यू १७५ हि. सन) आपणास भेटू इच्छितात.' अम्मार बिन मन्सूरने त्यांची भेट घेतली. इमामसाहेबांनी त्यास विचारले, "मस्जिदमध्ये तुम्ही कोणते काव्य वाचत होता?" एवढा

मोठा इमाम व विद्‌वान आपल्याला कविता म्हणण्याची विनंती करीत असल्याचे पाहून त्याचा आनंद गगनात मावेनासा झाला. अम्मारने ती कविता त्यांच्यासमोर वाचण्यास सुरुवात केली. इमामसाहेब त्याची कविता ऐकत होते. त्यांच्या चेहऱ्यावर आनंद व प्रशंसेचे भाव उमटण्याऐवजी नाराजीचे व संतापाचे भाव उमटत होते. परंतु अम्मार आपली कविता वाचण्यात मग्न होता. कविता वाचून झाल्यावर त्याच्या नजरा इमामसाहेबांकडे वळल्या आणि त्यास आश्चर्याचा जणू धक्काच बसला. इमामसाहेबांकडून त्यास प्रशंसा व स्तुतीचीच आशा होती. परंतु इमामसाहेबांच्या चेहऱ्यावर प्रशंसा आणि स्तुतीऐवजी संताप व क्षोभ झळकत होता. इमाम लैस स्वतःला सावरून पैशांनी भरलेली एक थेली त्यास देऊन म्हणाले,

"हे अम्मार ! आपल्या कविता आणि कवनशक्ती शासकांच्या स्वाधीन करू नका. त्यांच्या फाजील स्तुती आणि प्रशंसांनी कवितांना दूषित करू नका. कारण स्तुती आणि प्रशंसा हा केवळ सर्वश्रेष्ठ शासक असलेल्या एकमेव ईश्वराचाच अधिकार आहे. कोणत्याही मानवास हा अधिकार देऊ नये. केवळ ईश्वराचेच गुणगान आणि प्रशंसा करावी. ईश्वराची इच्छा असल्यास मी प्रत्येक वर्षी एवढीच रक्कम तुम्हाला पाठवीत राहीन."

त्यांचे शब्द ऐकून अम्मारचे डोळे पाणावले. त्याने इमाम लैस यांच्यासमोर प्रतिज्ञा केली की, या पुढे तो बादशाहची खोटी स्तुती कधीच करणार नाही. इमाम लैस हेसुद्धा मरेपर्यंत त्यास वार्षिक वेतन देत राहिले.

(२)

हे होते आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांच्या मार्गदर्शक शिक्षणाचे गाढे अभ्यासक, विद्‌वान आणि इजिप्त या देशाचे विख्यात प्रेषितवचन तज्ज्ञ ज्यांच्या उच्च विद्‌वत्तेचा शिक्का लाखोंच्या हृदयावर मोर्तब झालेला होता. मोठमोठे धर्मपंडितांनी त्यांच्याकडून ज्ञानलाभ घेतला. प्रेषितवचनांचे ज्ञान त्या काळातील मोठमोठ्या विद्‌वानांनी त्यांच्याकडून घेतले. त्यांच्याच शिष्यांकडून आपल्यापर्यंत प्रेषितवचने जशीच्या तशी पोहोचली आहेत आणि जग संपेपर्यंत इस्लामच्या प्रत्येक अनुयायांपर्यंत पोहोचत राहतील.

'यह्या बिन सईद' हे इमाम लैस यांचे गुरू आहेत. ते इमाम लैस यांच्या बाबतीत नेहमी म्हणत असत की, "लैस हे आपल्या काळातील प्रेषितवचन शास्त्राचे प्रमुख विद्‌वान आहेत."

इमाम लैस इराकला गेल्यावर बादशाह मेहदीने आपल्या मंत्र्यास सूचना दिली होती की, इमाम लैसकडून विद्यार्जन करावे. कारण ते या काळाचे सर्वांत महान विद्‌वान आहेत. त्यांची स्मरणशक्ती अतिशय कमालीची प्रचंड होती. इस्लामचे दुसरे शासक माननीय उमर (र) यांच्या शिष्यांकडून मिळालेला प्रेषितवचन संग्रह त्यांना मुखपाठ होता.

इमामसाहेबांनी आपली सत्यनिष्ठा पोलादी पुरुषाप्रमाणे जोपासली. ते इस्लामी जीवनाचे एक चालते बोलते उदाहरण होते. ते जी प्रेषितवचने सादर करीत त्यावर स्वत:देखील आचरण करीत असत. इस्लामी जीवनपद्धतीची ते जणू चालती फिरती शिक्षण संस्थाच होती. ते एक गर्भश्रीमंत व्यक्ती होते. त्यांच्याकडे अमाप संपत्ती होती. शिवाय ते एक यशस्वी व्यापारीसुद्धा होते. स्वत:च्या संपत्तीचा अधिकतर भाग ते लोकशिक्षण आणि जनकल्याणात खर्च करीत असत. त्याचप्रमाणे त्यांनी स्वखर्चाने कितीतरी संशोधन संस्था उघडून तेथे संशोधन कार्य चालू ठेवले होते. त्यांच्या संशोधन संस्थांमध्ये मोठमोठे विद्वान आणि तज्ज्ञ काम करीत असत. विधिज्ञ इमाम मालिक यांना ते वार्षिक शंभर दीनार (जवळपास सध्याचे एक लक्ष रुपये) पाठवित असत. एकदा इमाम मालिक यांच्यावर खूप.कर्जाचे ओझे वाढले. तेव्हा इमाम लैस यांनी त्यांना पाचशे दिनार (पाच लक्ष रुपये) पाठवून दिले.

एकदा एक स्त्री इमाम लैस यांच्या सेवेत हजर झाली आणि आपल्या आजारी असलेल्या पतीसाठी थोडेसे मध मागितले. यावर इमामसाहेबांनी सचिवास आज्ञा दिली की, या महिलेस एक मनभर मध देऊ करा. सचिवाने विचारले की तिने तर थोडेसेच मागितले? यावर इमामसाहेब उत्तरले, "तिने आपल्या पात्रतेनुसार मागणी केली व आपण आपल्या पात्रतेनुसार तिला देऊ केले."

ते दानशूर तर होतेच, शिवाय पाहुणचारसुद्धा खूप आनंदाने करीत असत. पाहुण्यांची पाहुणचार ते आपल्या नातेवाईकांपेक्षा जास्त आदरातिथ्याने करीत. पाहुण्यांची निरोप घेण्याची इच्छा असल्यास ते पाहुण्यांना प्रवासखर्चसुद्धा देऊन आणि आवश्यक सामग्री देऊन वाटे लावीत असत. ते प्रवासामध्ये असतानासुद्धा सोबत एवढे अन्नपाणी आणि जेवणसामुग्री घेत असत की प्रवासामध्ये ते गरिबांना सार्वजनिक भोजणाचे आमंत्रण देत असत. त्यांचे स्वत:चे जीवन आणि राहणीमान मात्र अतिशय साधे होते. अगदीच साधा पोषाख आणि अगदीच सामान्य स्वारी अर्थात फिरण्याकरिता गाढव ते वापरत असत.

प्रकरण बारावे

# जनतेचा हृदयसम्राट

"मी आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांच्या सोबत्यांच्या चारित्र्यांचा वेध घेतला. ते अगदीच उच्च चारित्र्याचे लोक होते. अब्दुल्लाह बिन मुबारक त्यांच्या शिष्यांपैकी एक होते. तेसुद्धा प्रेषित सोबत्यांसारखेच उच्च चारित्र्याचे होते." (इती : सुफियान बिन उयैना)

(१)

'रुक्क़ा' मध्ये अब्दुल्लाह बिन मुबारक (र) यांचे आगमन होताच हजारोंच्या संख्येने त्यांचे चाहते त्याच्या स्वागतासाठी उसळले. या लोकांमध्ये बहुसंख्याक लोक असे आहेत की, ज्यांनी अद्याप अब्दुल्लाह बिन मुबारक यांना पाहिलेच नाही. तरी देखील त्यांच्या विद्वत्ता, संशोधक बुद्धी आणि सडेतोड भूमिकांचा सर्वांनाच चांगला परिचय होता. शहरात दाखल होताच प्रचंड जनसमुदायाने त्यांचे जल्लोषपूर्ण स्वागत केले. लोक हस्तांदोलन करण्यासाठी अक्षरश: गर्दी करीत होते. त्या काळात बादशाह हारून रसीदसुद्धा 'रुक्क़ा' शहराला भेट देण्यासाठी आलेला होता. त्याची एक दासी राजप्रासादाच्या उंच बुरुजावरून हे सर्व दृष्य पाहत होती. तिने आपल्या सेवकांना विचारले की, 'ही कशाची गर्दी आहे?' तिच्या सेवकांनी तिला सांगितले की, 'खुरासान'च्या प्रदेशातून इस्लामी विद्वान अब्दुल्लाह बिन मुबारक येत आहेत. ती आश्चर्याने म्हणाली की, "ईश्वराची शपथ ! बादशाह तर हेच महाशय आहेत. 'हारूम रशीद' कसले बादशाह जे पोलिस आणि शिपायांची मदत घेतल्याशिवाय लोकांना जमा करू शकत नाहीत?"

अब्दुल्लाह बिन मुबारक (र) यांना भेटण्यास स्वत: बादशाह हारून रशीदसुद्धा उत्सुक होता. सुरक्षा अधिकारी इब्राहीम बिन नूह 'मूसली' सेवेत हजर होऊन म्हणाला, "अमीरुल मुअमिनीन! अब्दुल्लाह बिन मुबारक (र) 'खुरासान' येथील रहिवासी आहेत. मला अशी शंका येते की, आपणास वाईट वाटणाऱ्या अथवा आपल्या प्रतिष्ठेस धक्का पोहोचविण्याऱ्या गोष्टी ते तुमच्यासमोर करतील. परिणामी आपणास संताप येईल व त्यांना ठार करण्याचा आपण आदेश द्याल आणि या पापामध्ये मीसुद्धा गोवला जाईन. तसेच या महापापाचे ओझे माझ्याच डोक्यावर राहील."

बादशाह हारून रशीद शांत बसला होता. काही दिवसांनंतर पुन्हा त्यास इमामसाहेबांची भेट घेण्याची इच्छा होते. इब्राहीम पुन्हा बादशाहला सुचित करतो की, "इमाम अब्दुल्लाह बिन मुबारक खूपच कडक स्वभावी आहेत. तुम्ही त्यांचे कड़वे बोल सहन करू शकणार नाही." असे म्हणून इब्राहीमने बादशाह हारून रशीदला न भेटण्याचाच सल्ला दिला.

तीन दिवसानंतर स्वत:च अब्दुल्लाह बिन मुबारक (र) बादशाह दरबारी येतात. ज्या

लोकांना अब्दुल्लाह बिन मुबारक (र) यांच्या राजकारणविरोधी स्वभावाची कल्पना होती, त्यांना आश्चर्याचा धक्काच बसला. त्यांना वाटले की, अब्दुल्लाह बिन मुबारक हे तर बादशाह हारून रशीद यांस मुळीच पसंत करीत नाहीत, मग अचानक बादशाहच्या भेटीकरिता दरबारी कसे काय आले? परंतु इमाम अब्दुल्लाह बिन मुबारक यांनी उत्तर दिले, "मी आपल्या अंत:करणास मृत्यूसाठी राजी करू इच्छित होतो, परंतु ते लवकर राजी होत नव्हते. आता तो मृत्यूला कवटाळण्याकरिता राजी झाला, म्हणून बादशाहकडे आलो."

(२)

अब्दुल्लाह बिन मुबारक (र) हे एका गुलाम वंशात जन्मले. त्यांचे पिता खूप धर्मनिष्ठ आणि सत्यनिष्ठ होते. त्यांचा स्वामी त्यांच्या धार्मिक आचरणामुळे खूप प्रभावित होता. तो त्यांचा खूप सन्मान करीत असे. त्याची एक सुंदर, तरुण व सुशील मुलगी होती. तिला विवाहाकरिता खूप मोठमोठी स्थळे आणि मागण्या येत होत्या. परंतु एवढ्या स्थळांपैकी मुलगी कोठे द्यावी, या विचाराने तो खूप चिंतित होता. एकदा त्याने अब्दुल्लाह बिन मुबारक यांना विचारले, "मुबारक! मी माझ्या मुलीचा विवाह कोणाशी करू?" यावर मुबारक उत्तरले, "इस्लामपूर्व काळात लोक वंशावळ पाहत असत. 'ज्यू' लोक संपत्ती असलेले स्थळ पाहत असत आणि ख्रिश्चन सौंदर्य पाहत असत. परंतु आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांनी या तिन्ही गोष्टींना व्यर्थ ठरवून असे स्थळ पाहून विवाहाचे आदेश दिले की, ज्या स्थळाचे लोक धर्मनिष्ठ आहेत. यापैकी आपणास जे पटेल तसे करावे."

'मुबारक' यांचे हे धर्मनिष्ठ आणि मार्गदर्शनपूर्ण वाक्य ऐकून मालक खूप प्रभावित झाला. तो तत्काळ घरी येऊन आपल्या पत्नीस म्हणाला, "आपण बऱ्याच दिवसांपासून मुलीसाठी वर पाहत होतो. मला तर मुबारकपेक्षा चांगला, प्रामाणिक आणि धार्मिक मुलगा इतरच कोठेच दिसत नाही. म्हणून त्यालाच जावई करण्याची माझी इच्छा आहे." यावर मालकीनबाईसुद्धा खूप आनंदी झाल्या. त्यांनी पतीला सांगितले की, "मलासुद्धा 'मुबारक' खूप आवडतो आणि मग मुबारकशी त्यांच्या मुलीचा विवाह सुखरूपपणे आणि अगदीच साधेपणाने पार पडला."

इमाम अब्दुल्लाह याच मुबारकाचे सुपुत्र होय. अब्दुल्लाह बिन मुबारक हे धर्मनिष्ठ, विद्वान आणि अत्यंत शूर योद्धेसुद्धा होते.

एकदा ते आपली मायभूमी 'मरू' येथून 'सीरिया' पोहोचले. तेथे लिहिण्यापुरती एकाकडून लेखणी घेतली आणि परत करणेच विसरले आणि मायदेशी परतले. घरी आल्यावर त्यांची दृष्टी लेखणीवर पडली. ते तत्काळ उठले आणि शेकडो किलोमीटरचा प्रवास करून सीरियास जाऊन लेखणी परत करून त्या लेखणीवाल्याची माफी मागितली. यावरून अब्दुल्लाह बिन मुबारक यांच्या नीतिमत्तेची आणि धर्मनिष्ठेची कल्पना येते.

अब्दुल्लाह बिन मुबारक खूप मोठे व्यापारी होते. परंतु व्यापारातून मिळालेला पैसा दुर्बलांची मदत करण्यात आणि त्यांच्या पुनर्वसनात ते लाखो रुपये खर्च करीत असत.

एकदा त्यांना माहिती मिळाली की, एका व्यक्तीवर सातशे दिरहम एवढे कर्ज असून कर्ज चुकविण्याचे त्यात सामर्थ्य नाही. अब्दुल्लाह बिन मुबारक यांनी त्यास सात हजार दिरहम देण्याचे पत्र आपल्या सचिवाच्या नावाने त्याच्या हाती दिले. सचिवाने पत्र वाचून त्यास विचारले की, तुम्हाला किती पैशांची गरज आहे? 'त्याने उत्तर दिले की सातशे दिरहमची' सचिवाला वाटले की, अब्दुल्लाह बिन मुबारक यांनी कदाचित चुकून सातशे ऐवजी सात हजार लिहिले असावे. त्याने प्रकरणाची शाहनिशा करण्यासाठी उलट त्याच्याच हाती पत्र पाठविले की, 'गरजवंतास केवळ सातशे दिरहमची गरज असून आपण सात हजार लिहिले आहे. किंबहुना हे आपल्या नजरचुकीने तर घडले नाही?' यावर अब्दुल्लाह बिन मुबारक यांनी परत पत्र लिहिले की, "माझे पत्र मिळताच त्या गरजवंतास चौदा हजार दिरहम देण्यात यावे." त्यांचे उत्तर वाचून सचिव म्हणाला, "आपण विनाकारण आपली संपत्ती वाया घालवित असून लवकरच आपली संपत्ती संपून जाईल." यावर अब्दुल्लाह बिन मुबारक यांनी त्याची कानउघाडणी करताना लिहिले की, "तुम्ही जर माझ्या हाताखाली काम करण्याचे इच्छूक असाल तर चुपचाप आज्ञापालन करावे आणि मलाच आदेश द्यायचे असल्यास तुम्ही माझ्या जागी यावे आणि मी तुमच्या जागी बसतो. मग तुम्ही जो आदेश द्याल, मी त्याचे काटेकोर पालन करीत राहीन. माझ्या दृष्टीत या ऐहिक जीवन आणि भौतिक संपत्तीचे काहीही महत्त्व नाही. दुर्बलांना आणि पददलितांना मदत करणे हीच माझ्या पारलौकिक यशाची किल्ली आहे. आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांनी म्हटले आहे की, जर आपल्या मानवबंधुस कोणी अचानक खूश करेल, ईश्वर त्यास मोक्ष देईल. त्याने मला सातशे दिरहम मागितले होते. मला वाटले की, त्यास सात हजार दिरहम देऊन आनंदाचा धक्का देईन, तर ईश्वर मला या पुण्यकर्माचे फळ देईन. परंतु त्या गरजवंतास कळून चुकल्याने त्याचा आनंद अचानक त्यास मिळाला नाही. म्हणून मी त्यास चौदा हजार दिरहम देऊन अचानक सुखद धक्का दिला."

(३)

अब्दुल्लाह बिन मुबारक (र) दुसऱ्या धर्मनेत्यांप्रमाणेच शासनकर्त्यांचे विरोधक होते. ते कोणत्याही अधिकाऱ्यांशी संबंध ठेवीत नसत आणि इतरांनासुद्धा मनाई करीत असत. त्यांची स्पष्ट भूमिका होती की, धार्मिक नेत्यांचे शासनकर्त्यांशी संबंध असणे म्हणजे शासकांची आरती ओवाळणे आणि त्यांच्या दबावास अथवा आमिषांना बळी पडून अपराधास पुण्य, वैध बाबीस अवैध आणि असत्यास सत्य ठरविणे होय. म्हणूनच सत्यप्रिय धर्मनेत्यांचा एक मोठा वर्ग शासनकर्त्यांपासून दूर राहिला आहे. अब्दुल्लाह बिन मुबारकसुद्धा यांपैकीच होते. ते शासनकर्त्यांशी ठेवण्यात येणारे संबंध म्हणजे धर्म विकणे समजत असत.

एकदा त्यांना वार्ता मिळाली की, त्यांचे मित्र 'इब्ने उलैया' शासनकर्त्यांशी आणि सरकारी अधिकाऱ्यांशी संबंध ठेवू लागले. तसेच त्यांना सदकात (दानाची रक्कम) वसूल करण्याच्या अधिकारीपदावर त्यांची नेमणूक करण्यात आली. ही वार्ता कळाल्यावर अब्दुल्लाह बिन मुबारक यांना खूप दु:ख झाले. बऱ्याच दिवसांनंतर एका सभेत त्यांची भेट झाल्यावर ते त्यांना बोललेसुद्धा नाही. हे पाहून 'इब्ने उलैया' यांनासुद्धा खूप वाईट वाटले. सभेत त्यांनी प्रसंगावधान ओळखून अब्दुल्लाह बिन मुबारक यांना आपल्याशी न बोलण्याचे कारण न विचारता घरी आल्यावर त्यांना एक पत्र लिहिले,

"हे माझ्या परम मित्रा आणि माझे गुरुवर्य ! तुमचे माझ्यावर भरपूर उपकार आहेत, तुमच्या उपकारांना मी स्वत: माझ्यास्तव आणि माझ्या परिवारास्तव मंगल समजतो. परंतु आपण माझ्याशी एवढे नाराज का आहात? मी तुमच्या सभास्थळी येऊन गेलो, परंतु तुम्ही मला बोलण्याची तसदीसुद्धा घेतली नाही. आपल्या नाराजीचे कारण मला अद्याप समजले नाही. माझी कोणती चूक आहे, ते मला तत्काळ कळवावे."

अब्दुल्लाह बिन मुबारक यांनी त्यांना पत्राचे उत्तर अशा प्रकारे दिले,

"हे मित्रा, शासनाकरिता तू गरिबांची संपत्ती लुटून घेऊन जातो. ऐहिक जीवन समृद्ध करण्यासाठी तू धर्म नष्ट करण्याची साधने निर्माण केली आहेत. तू तर वेड्यांवर उपचार करीत होतास. परंतु तू स्वत: वेडा झालास. कुठे आहे तुझे सत्यज्ञान आणि धर्मनिष्ठा? काय झाले त्या प्रेषितवचनांचे जी तुझ्याकडून 'इब्ने ऊन' आणि 'इब्ने सिरीन', सारखे विद्वान कथन करीत होते? त्या प्रेषितवचनांचे काय झाले, ज्यामध्ये शासनकर्त्यांशी संबंध ठेवण्याची मनाई करण्यात आली आहे? तुम्ही कदाचित म्हणाल की, तुमच्यावर बळजबरी करण्यात आली. परंतु का? हे खरे आहे की केवळ पुस्तकी ज्ञानाचे ओझे वाहणारा असाच अपमानित होत असतो."

'इब्ने उलैया' यांनी पत्र वाचतात त्यांची तीव्र दु:खाने भरलेली किंचाळी निघाली. त्यांना आपल्याकडून झालेल्या चुकीचा खूप पश्चात्ताप झाला आणि त्यांनी तत्काळ राजीनामा दिला.

अब्दुल्लाह बिन मुबारक यांच्यात अपार ईशपरायणता होती. ते म्हणत असत की, 'माणूस जर शंभर बाबतीत ईशपरायणता अंगीकारीत असेल आणि एखादी बाब सोडून देत असेल, तर तो ईशपरायण असू शकत नाही.' अब्दुल्लाह बिन मुबारक हे साहित्यप्रेमी आणि सुसंस्कृत होते. ते नेहमी म्हणत असत की, साहित्य आणि संस्कृती धर्माच्या दोन बाजू आहेत.

त्यांच्या स्वभावात खूप नम्रता, विनय आणि शालीनता होती. त्यांचे चालणे, बोलणे, वागणे आणि चारचौघात उठणे-बसणे, तसेच एकूणच राहणीमानातून ते स्वत:स इतरांपेक्षा विशेष असल्याची जाणीव कधीच होऊ देत नसत. 'मरू' या शहरात त्यांचा मोठा बंगला होता. त्यांच्या

चाहत्यांची तेथे नेहमीच गर्दी असे. परंतु त्यांच्या श्रद्धेपोटी लोकांनी एवढी गर्दी करणे त्यांना आवडत नसे. त्यामुळे त्यांनी आपले हे घरदार सोडून 'कुफा' शहरात एका छोट्याशा घरात वास्तव्य स्वीकारले. लोकांनी विचारले की, एवढी मोठी आणि भव्य इमारत सोडून आपण या छोट्याशा घरात कशापायी राहता?'' यावर ते उत्तरले, ''जी गोष्ट तुम्हाला आवडते (अर्थात श्रद्धाळूंची गर्दी) ती मला आवडत नाही. मी अनोळखी आणि अप्रसिद्ध असलेलाच बरा!''

त्यांनी वर्षाची तीन भागात विभागणी केली होती. एका भागात व्यापार करीत. दुसऱ्या भागाच्या काळात शिक्षण व प्रशिक्षण देत आणि तिसऱ्या भागात धर्मयुद्ध आणि हज करीत असत.

अब्दुल्लाह बिन मुबारक यांच्या ज्ञानसागरातून काही माणिक मोती आपणही वेचू या. ते म्हणत असत, प्रसिद्धीपासून दूर राहावे आणि अज्ञातवासात राहावे, परंतु हे दिसता कामा नये की तुम्ही अज्ञातवास पसंत करता. यामुळेसुद्धा माणसात गर्व आणि अहंकार निर्माण होतो. विनय हा आहे की निस्पृहतेऐवजी माणसात आत्मप्रतिष्ठा असावी.

बरीच लहान पुण्य कर्मे अशी असतात की, जी केवळ फक्त ईशप्रसन्नतेस्तव केली गेल्यामुळे खूप मोठी सिद्ध होतात. तसेच बरीचशी मोठी पुण्यकर्मे अशी असतात की, ती स्वार्थी हेतुस्तव आणि प्रसिद्धी मिळविण्यास्तव केली गेली असल्याने निरर्थक ठरतात व वाया जातात. ज्ञानासाठी सर्वप्रथम हेतुची प्रामाणिकता, मग आकलनशक्ती, मग स्मरणशक्ती आणि मग त्याच्या प्रसाराची गरज आहे.

विशेषजणांमध्ये निर्माण झालेल्या बिघाडामुळे सामान्य जनतेत बिघाड निर्माण होतो. आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांच्या अनुयायांचे पाच वर्ग आहेत. या पाच वर्गांत बिघाड निर्माण झाल्यास संपूर्ण समाज दूषित होतो.

१) 'धर्मज्ञानी' हे प्रेषितांचे वारस आहेत. परंतु जेव्हा धर्मज्ञानीच ऐहिक समृद्धी व भौतिक सुखवस्तूंच्या मागे पळत सुटतात तेव्हा कोणाचे नेतृत्व स्वीकारावे?

२) 'व्यापारीवर्ग' हा ईश्वराचा अनामतदार आहे. परंतु यांनीच जर अनामती हडपल्या तर मग कोणावर विश्वास ठेवावा?

३) 'धर्मयोद्धे' हे ईश्वराचे पाहुणे आहेत. यांनीच जर शत्रुंची युद्धाप्रसंगी हस्तगत केलेली संपत्ती चोरण्यास सुरुवात केली तर शत्रुंवर कोणाकरवी जय प्राप्त करता येईल?

४) 'त्यागी' हे भूलोकांचे खरे मालक व स्वामी आहेत. त्यांचीच भावना जर बिघडली तर मग कोणाचे अनुकरण करावे.

५) 'शासक' हे मानवजातीचे रक्षक आहेत. जर हेच रक्षक भक्षक बनल्यास मानवसुरक्षा कशी शक्य होईल?

प्रकरण तेरावे

# अब्बासी शासनाचे प्रमुख न्यायाधीश

इमाम अबू यूसुफ (जन्म ११३ हि.स. मृत्यु १८२ हि. सन)

"हे ईश्वरा ! तुला चांगलेच ठाऊक आहे की, तुझ्या दासांच्या दरम्यान न्याय करताना मी कधीच स्वेच्छेने काम केले नाही व कोणत्याच निवाड्यामध्ये अन्याय होऊ दिला नाही. माझे नेहमीच हे प्रयत्न राहिले की, मी दिलेला निर्णय नेहमीच ईश्वरीय ग्रंथ आणि आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांच्या जीवनप्रणालीनुसार असावा. हे ईश्वरा ! मी नेहमीच आपले पावित्र्य भंग होऊ दिले नाही आणि जाणूनबुजून एकही अवैध व निषिद्ध पैसा खाल्ला नाही."

(१)

अब्बासी बादशाह 'हारुन रशीद' हा जुमाच्या नमाजपूर्वी भाषण देत होता. एकजण उठून उभा राहून ओरडला, "ईश्वराची शपथ! तुम्ही जनतेमध्ये न्यायास अनुसरून संपत्तीचे वाटप केले नाही आणि न्याय केला नाही. तुमचे चारित्र्य अन्याय व पापांनी डागाळलेले आहे." भर सभेत त्या माणसाच्या बोलण्याचा बादशाह हारून रशीदला भयंकर संताप चढला. समोर बसलेला प्रेक्षकवर्गसुद्धा आता काय घडेल, या भीतीने हादरून गेला. "या माणसाला बेड्या घाला!" बादशाहने हारून रशीद आदेश दिले. सुरक्षा गार्डने तत्काळ त्या माणसास सत्य बोलण्याच्या अपराधास्तव अटक केली.

नमाज आटोपल्यावर अपराध्यास बादशाहसमोर हजर करण्यात आले. "इमामसाहेबांना बोलवा !" बादशाहने आदेश दिला. थोड्याच वेळात मुख्य न्यायाधीश इमाम अबू यूसुफ यांचे आगमन झाले. त्यांनी संपूर्ण प्रकरणावर एक वेधात्मक दृष्टी टाकली. अपराध्यामागे दोन शस्त्रधारी बादशाहच्या आदेशाची वाट पाहत उभे आहेत. संपूर्ण दरबारात भयाण शांतता पसरलेली आहे. दरबारामधील सर्वचजण घडणाऱ्या घटनेच्या भीतीने स्तब्ध उभे आहेत.

"या माणसाने मस्जिदीमध्ये सर्व लोकांत माझा अपमान केला." हारून रशीद इमामसाहेबांना म्हणाला. इमाम अबू यूसुफ यांनी संपूर्ण प्रकरण ऐकून घेतले आणि मग गंभीरपणे म्हणाले, "हे बादशाह ! एकदा आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) युद्धात हस्तगत झालेली शत्रुंच्या संपत्तीचे वाटप करीत होते. अशा वेळी एक खेडूत उठून उभा राहिला आणि म्हणू लागला, "ही वाटणी ईश्वराच्या मर्जीविरुद्ध झाली आहे. आपण संपत्ती वाटणीमध्ये न्याय केला नाही." आदरणीय प्रेषितांनी त्या खेडूताच्या बोलण्याचे वाईट वाटून न घेता अत्यंत दयापूर्ण शब्दांत त्यास सांगितले, जर मीच न्याय केला नाही तर मग कोण करणार?" एकदा जुबैर (र) आणि एका मदीनावासीयांदरम्यान एक प्रकरण होते. हे प्रकरण आदरणीय प्रेषित

मुहम्मद (स) यांच्या न्यायदरबारी पोहोचले. आदरणीय प्रेषितांनी "जुबैर (र) यांच्या बाजूने निर्णय दिला. अन्सारी सोबत्याने म्हटले, "ते तुमचे आत्याभाऊ असल्याने तुम्ही त्यांच्याबाजूने निर्णय दिला." परंतु आदरणीय प्रेषितांनी त्याच्या बोलण्याचे वाईट वाटून न घेता त्याची शांतपणे समजूत घातली."

इमाम अबू यूसुफ (मुख्य न्यायाधीश) यांनी आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांच्या संयमी आणि मृदु स्वभावाचे संदर्भ देताच बादशाह हारून रशीद याच्या रागाचा पारा खालावत गेला आणि त्याने त्या माणसास सोडून देण्याचे आदेश दिले.

एकदा उच्च न्यायालयाचे अधिवेशन सुरु होते. मुख्य न्यायाधीश इमाम अबू यूसुफ हे प्रकरणाचे निवाडे निकाली काढीत होते. सुनावणी सुरू झाली होती आणि बादशाहचा मुख्य सचिव फ़ज़ल बिन रबीअ यास साक्षीदार म्हणून हजर करण्यात आले. न्यायाधीश महोदय इमाम अबू यूसुफ यांनी त्याची साक्ष स्वीकारण्यास नकार दिला. सचिव असलेला फ़ज़ल बिन रबीअचा चेहरा संतापाच्या अतिरेकाने लालबुंद झाला. गळ्यात रक्त उतरले. तो बडबड करीत न्यायालयातून बाहेर पडला आणि थेट बादशाह हारून रशीदकडे पोहोचला आणि इमामसाहेबांची तक्रार केली की, इमामसाहेबांनी माची साक्ष रद्दबातल ठरवून आपला म्हणजे बादशाहचा घोर अपमान केला. बादशाह हारून रशीदचा पारा चढला. त्याने न्यायाधीश अबू यूसुफ यांना हजर राहण्याचा आदेश दिला. न्यायालयाचे कामकाज आटोपून न्यायाधीश महोदय बादशाहदरबारी हजर झाले. बादशाह हारून रशीद रागाच्या भरात कडाडला, "तुम्ही फ़ज़ल बिन रबीअ' ची साक्ष का घेतली नाही?"

"हे बादशाह !" इमामसाहेब न घाबरता म्हणाले, "एकदा तो म्हणाला होता की, तो तुमचा गुलाम आहे. तो जर खरे बोलला असेल, तर गुलामाची साक्ष इस्लामी नियमानुसार घेता येत नाही आणि तो जर खोटे बोलला असेल, तर इस्लाममध्ये खोटे बोलणाऱ्यांची साक्ष घेता येत नाही. म्हणून मी त्याची साक्ष स्वीकारली नाही." त्यांच्या कणखर आणि दृढतापूर्ण उत्तरावर बादशाह हारून रशीदचा राग पार थंड झाला व त्याला आपली चूक कळून चुकली. हे तर केवळ सचिवाच्या बाबतीत झाले. स्वत: बादशाहलासुद्धा न्यायाच्या कसोटीवर इमामसाहेबांचा खाक्या प्रसिद्ध आहे. ते कोणाचाही अधिकार त्याला मिळवून दिल्याशिवाय सुखाने बसत नसत. ते मेहदी अब्बास या बादशाहच्या काळापासूनच प्रमुख न्यायाधीश राहिलेले होते. एकदा हादी बादशाहाचा एका सामान्य नागरिकाबरोबर एका बगिचावरून हा तंटा सुरू होता. दोन्ही पक्ष या बगिचावर आपापल्या मालकीचा दावा करतात. शेवटी हे प्रकरण मुख्य न्यायाधीश अबू यूसुफ यांच्या न्यायालयात दाखल करण्यात येते. न्यायाधीश महोदयांनी उभय पक्षांचा वाद आणि साक्षी तपासून घेतल्या. साक्षीवरून तर बागेचा बादशाहचाच असल्याचे सिद्ध होते. परंतु

इमाम अबू यूसुफ यांचे साक्षीदारांवर समाधान होत नाही. ते गुप्तपणे या प्रकरणाची चौकशी सुरू करतात. या गुप्त चौकशीतून सत्य समोर येते की, हा बागेचा बादशाहचा नसून द्वितीय पक्ष असलेल्या त्या सामान्य नागरिकाचाच आहे. तसेच हेसुद्धा त्यांच्या लक्षात येते की, बादशाहविरुद्ध साक्ष देण्याचे कोणाचेही नैतिक धैर्य झाले नसल्याने कोणीच बादशाहविरुद्ध साक्ष दिली नाही. त्यामुळे त्यांनी न्यायालयाची सुनावणी तहकूब केली. जेव्हा बादशाह हादीची इमामसाहेबांशी भेट झाली, तेव्हा त्याने विचारले,

"न्यायधीश महोदय ! प्रकरणाचा निकाल कोणाच्या बाजूने लागला?"

यावर इमाम साहेबांनी उत्तर दिले की, "साक्षीदारांच्या जबाब नोंदणीवरून तर लक्षात येते की बागेचा आपलाच आहे. परंतु द्वितीय पक्षाने मागणी केली की, आपण हा बागेचा तुमचा असल्याचे शपथपत्र द्यावे."

"मग आपली काय भूमिका आहे?" बादशाहने विचारले,

इमामसाहेबांनी उत्तर दिले की, 'मलासुद्धा असेच वाटते की, आपण शपथपत्र सादर करावे."

यावर बादशाह म्हणाला की, "ठीक आहे, जाऊ द्या, बागेचा त्याला देऊन टाका."

(२)

अब्बासी शासक मुख्य न्यायाधीश अबू यूसुफ यांचा अपार आदर आणि सन्मान करीत असे. तो बादशाह असूनही त्यांना पुढे येऊन सलाम करीत असे. तो त्यांच्या न्यायपूर्ण वर्तन आणि सत्यसमर्थक आचरणाने खूप प्रभावित होता. इमामसाहेब कधीच बादशाही सामर्थ्यासमोर नमले नाहीत. सत्यासमोर त्यांनी महाकाय व शक्तिशाली बादशाहीला नमते घेणे भाग पाडले. त्यांनी आपल्या जीवनात शासनाधिकाऱ्यांना कधीच सत्तेचा गैरवापर करू दिला नाही. न्यायदानाच्या वेळी त्यांनी राजा आणि प्रजा, दोघांत कधीच भेदभाव पाळला नाही.

एकदा एक माणूस त्यांच्या सेवेत हजर होऊन म्हणाला, "मी आपल्या नावाचे एक 'बोगस' पत्र लिहून एका माणसाकडून पैसे घेतले होते. आता मुदत संपल्याने तो पैशांचा तगादा लावीत आहे. माझा जीव वाचविण्याची कृपा करावी." इमाम अबू यूसुफ़ यांनी या माणसास अटक करून सांगितले की 'जोपर्यंत पैसा परत करणार नाही, तोपर्यंत तुझी सुटका होणार नाही.'

तो माणूस न्यायधीश महोदयांचे हे कठोर वर्तन पाहून त्यांच्यासमोर गयावया करतो व आपल्याला सोडून देण्याची विनंती करतो. तसेच हेसुद्धा सांगतो की,

"मी यापूर्वीसुद्धा एकदा आपले गुरू असलेले 'अबू हनीफ़ा' यांच्या नावावर एक बोगस 'लेटर हेड' तयार करून एकाकडून पैसे काढले होते. परंतु त्यांना या प्रकरणाची कल्पना देताच

त्यांनी मी घेतलेल्या कर्जाची स्वत: भरपाई दिली होती. म्हणून आपणही त्याच गुरुवर्यांचे शिष्य असल्याने मला आशा होती की, आपणही माझे कर्ज चुकते करून माझा जीव सोडवाल. परंतु हे तर उलटेच झाले.'' त्याचे बोलणे ऐकून झाल्यावर इमामसाहेब गंभीरपणे म्हणाले, ''मी गुरुवर्य अबू हनीफ़ा नाही. ते एक थोर विद्वान होते. लोक त्यांचा आदर करीत असत आणि म्हणूनच त्यांच्या नावावर पैसा देवून टाकत असत. परंतु मी शासनाचा एक जबाबदार अधिकारी आहे. म्हणून ही संभावना नाकारता येत नाही की, ज्या माणसाकडून तुम्ही माझे नाव करून पैसे घेतले आहेत, तो पैसा देऊ इच्छित नसेलही, परंतु त्याने शासकीय भीतीला बळी पडून तुला पैसे दिले असावेत.''

तो माणूस एक दिवस कैदेत राहिला आणि दुसऱ्या दिवशी न्यायाधीश महोद्यांनी त्यास पाचारण करून सांगितले, ''ज्याच्याकडून तू माझे नाव करून पैसे घेतले आहेस, त्याला पैसे परत करण्यात आले. आता तुझी सुटका करण्यात येत आहे. हेसुद्धा शक्य आहे की, तो माणूस तुला ती रक्कम परत करील. तू मात्र ती मुळीच परत घेता कामा नये आणि यापुढे असे करू नकोस.''

(३)

इमाम अबू यूसुफ यांचे लहानपण खूप हलाखीत आणि गरिबीत गेले. वयाने मोठे झाल्यावरही त्यांच्या आर्थिक परिस्थितीत कोणतीच सुधारणा झाली नाही. 'अब्दुल्लाह बिन मुबारक' म्हणतात की, ''एकदा मी त्यांच्याकडे गेलो. त्यांनी माझ्यासमोर आपल्या आर्थिक टंचाईची परिस्थिति मांडली. मी त्यांचे सांत्वन करून बाहेर निघालो, तेव्हा मी पाहिले की, त्यांच्याजवळ फक्त एक मातीचे मळकट भांडे पडलेले आहे. मी उठताना चुकीने माझा हात त्यास लागून ते गडगडत जाऊन फुटले. मी त्यांच्या चेहऱ्याकडे पाहिले. मला आढळून आले की त्यांना हे मडके फुटलेले पाहून खूप दु:ख झाले.

''काय झाले?'' मी त्यांना विचारले.

''माझ्याकडे फक्त एकच भांडे होते.'' त्यांनी उत्तर दिले.

मला त्यांचे हे वाक्य ऐकून खूप दु:ख झाले आणि मी खिशातून काही रक्कम त्यांना देऊ केली. हेच गरीब आणि हलाखीचे जीवन कंठलेले अबू यूसुफ आज राज्याचे मुख्य न्यायाधीश आहेत. संपत्तीची रेलचेल आहे. परंतु संपत्ती आल्यावरही त्यांच्या स्वभावात कोणताच बदल दिसत नाही. त्यांनी गरिबांची खूप मदत केली. त्यांनी मृत्युपूर्वीच मृत्यूपत्र तयार करून आदेश दिला होता की, मी मृत्यू पावल्यावर माझी संपूर्ण संपत्ती गरिबात वाटण्यात यावी. म्हणून त्यांच्या मृत्यूपश्चात त्यांची संपूर्ण संपत्ती मदीना, कुफ़ा आणि बग़दाद शहरातील गरिबात वाटप करण्यात आली.

प्रकरण चौदावे

# जागृत अंत:करण

बादशाह हारून रशीद हज यात्रेकरिता मक्का शहरी आलेला होता. त्याचा मुख्य सचिव फ़ज़ल बिन रबीअ उशिरा रात्रीपर्यंत बादशाहजवळ होता. मग परवानगी घेऊन तो झोपण्यासाठी निघून गेला. त्याला गाढ झोप लागली होती. अचानक त्याच्या दरवाज्यावर खटखटण्याचा आवाज आला. फ़ज़ल झोपेतून जागा होऊन म्हणाला, "कोण आहे?"

"मी आहे बादशाह हारून रशीद !" उत्तर ऐकताच तो तत्काळ दरवाज्यावर येऊन म्हणाला, "आदेश व्हावा, हे राजन ! आपण गुलामास पाठविले असते तर हा सेवक स्वत: आपल्या सेवेत हजर झाला असता." बादशाह त्याचे हे उत्तर ऐकून म्हणाला की, 'हे फ़ज़ल! माझ्या मनात एक गोष्ट खटकत असून तिचे समाधान एका इस्लामी विद्वानाकडूनच शक्य आहे." बादशाहला लागलेली हुरहुर पाहून फ़ज़ल म्हणाला, "या मक्का शहरात 'सुफ़ियान बिन अबनीया' हे इस्लामचे प्रगल्भ विद्वान आहेत. आपण त्यांना भेटून समाधान करु या." दोघेही सुफ़ियान बिन अबनीयाकडे पोहोचले. दरवाज्यावर दस्तक देताच आतून "कोण आहे?" ऐकू आले.

"बादशाह हारून रशीद आपली भेट घेऊ इच्छितात." फ़ज़ल म्हणाला. सुफ़ियान बिन अबनीया तत्काळ बाहेर येऊन म्हणाले, "आपण विनाकारण तसदी घेतली. सूचना केली असती तर मी तत्काळ हजर झालो असतो."

"आम्ही जो हेतु घेऊन आलो तो पूर्ण करावा, एवढीच विनंती आहे." बादशाह म्हणाला. थोडावेळ गप्पा-टप्पा झाल्यावर बादशाहने विचारले, "आपल्यावर कर्ज आहे काय?"

"होय !" सुफ़ियान उत्तरले. "हे फ़ज़ल ! यांचे कर्ज चुकते करावे !" बादशाहने सचिवास आदेश दिला. मग दोघेही तेथून आपल्या आवासाकडे निघाले. रस्त्यात हारुन रशीद फ़ज़लला म्हणाला, "माझ्या मनातील सल दूर झाली नाही." फ़ज़ल आणखीन एका विद्वानाचे नाव सुचवून म्हणाला, "आपण त्यांच्याकडे जाऊ या." दोघे 'अब्दुर्रइझाक बिन हमाम' यांच्याकडे निघाले. फ़ज़लने दारावर खटका मारला. अब्दुर्रइझाक बिन हमाम 'स्वत: बाहेर आले. विचारल्यावर कळाले की, स्वत: बादशाह हारूने रशीद आपल्या सचिवासह आलेले आहेत.

"आम्ही ज्या हेतुस्तव आपणाकडे आलो आहोत, तो पूर्ण करावा !" बादशाहने विनंती केली. थोडावेळ गप्पा झाल्यावर बादशाहने विचारले, "आपणावर कर्ज आहे काय?" अब्दुर्रइझाक होकारार्थी मान हलवितात. "यांचे कर्ज चुकते करावे." बादशाहने सचिवास आदेश दिला.

तेथून परतताना रस्त्यात बादशाह म्हणाला, ''माझ्या मनात बोचत असलेली सल अजूनहीं तशीच आहे.''

''मग आपण फुझैल बिन अयाज़ (जन्म १०६, मृत्यू १८७ हि. स.) यांच्याकडे जाऊ या. ते निश्चितच तुम्हाला समाधान देतील.'' बादशाह आणि सचिव 'फुझैल बिन अयाज़' यांच्याकडे पोहोचले. दरवाज्यावर दस्तक देताच आतून ''कोण आहे?''ची विचारणा झाल्यावर ''बादशहा हारून रशीद आलेले आहेत.'' सचिवाने उत्तर दिले.

''मला बादशाहशी काय काम?'' दरवाज्याच्या आतूनच परत प्रश्न.

''बादशाहची आज्ञा पाळणे जरूरी नाही काय?'' बादशाहने नम्रतेने त्यांच्या प्रश्नाच्या उत्तरादाखल प्रश्न केला. 'फुझैल बिन अयाज़' यांनी दरवाजा उघडला आणि तात्काळ दिवा विझवून स्वत: एकीकडे सरकले. बादशाह आणि सचिव दोघेही अंधारात त्यांना शोधू लागले. शेवटी बादशाहचा हात त्यांच्या खांद्यावर पडला. ते म्हणाले, 'हे बादशाह ! तुमचा हात किती मऊ आहे. जर हे हात अंतिम निवाड्याच्या दिवशी ईश्वरीय कोपापासून मुक्त झाले तर किती भाग्यशाली ठरतील !''

''हे फुझैल ! ईश्वराची आपल्यावर कृपा असो. मी एका विशेष उद्दिष्टपूर्तीस्तव आपणाकडे आलो आहे.'' बादशाह मुख्य विषयाकडे त्यांना वळवू लागला.

''कोणता उद्देश आणि कसला उद्देश! आपण नेहमीच केवळ स्वत:वरच विश्वास केला, तसेच तुमच्या हस्तकांनीसुद्धा केवळ स्वत:च्या इच्छाआकांक्षावरच अंमलबजावणी केली. खरे पाहता तुमचे सर्वच हस्तक अंतिम निवाड्याच्या दिवशी आपल्या पापाचे ओझे तुमच्यावरच टाकतील. आज ते जेवढी तुमच्या प्रति कर्तव्यनिष्ठा दाखवीत आहेत, ते उद्या अंतिम निवाड्याच्या दिवशी तुमच्यापासून दूर पळतील.''

फुझैल बिन अयाज़ थोडेसे शांत झाल्यावर परत म्हणाले,

''हे राजन ! उमर बिन अब्दुल अज़ीज़ (र) यांनी जेव्हा इस्लामी शासनाची धुरा सांभाळली तेव्हा त्यांनी सालिम बिन अब्दुल्लाह बिन उमर बिन खत्ताब (र), मुहम्मद बिन कआबुल क़र्ज़ी आणि रिजा बिन हयात यांना बोलावून सांगितले, ''मला या अरिष्टात ओढण्यात आले, (अर्थात रयतेची सर्वांत मोठी जवाबदारी माझ्यावर टाकण्यात आली) म्हणून आपण मला सल्ला द्यावा. हे बादशाह! त्यांनी शासनास एक मोठी जवाबदारी समजली होती. परंतु तुम्ही आणि तुमच्या हस्तकांनी या जबाबदारीस अनुग्रह समजून घेतले. ते मिळविण्याकरिता तुम्ही प्राणांची बाजी लावता. सालिमने सल्ला दिला होता की, 'जर तुम्ही अंतिम निवाड्याच्या दिवशी ईश्वरीय कोपापासून मोक्ष इच्छित असाल, तर आपल्यापेक्षा वडीलधाऱ्या माणसांना आपल्या माता-पित्यासम, समवयीन जणांना

आपल्या भाऊ-बहिणीसम आणि आपल्यापेक्षा धाकट्यांना आपले अपत्य समजून व्यवहार करावा. आपल्या या नातलगांशी सदाचारी व्यवहार करावा. लहान आणि दुबर्लांवर प्रेम आणि उपकाराचा व्यवहार करावा."

रिजा बिन हयात यांनी उमर बिन अब्दुल अज़ीज़ यांना सल्ला दिला की, ईशकोपापासून मोक्ष मिळवावयाचे असल्यास रयतेकरिताही त्याच गोष्टी निवडा ज्या स्वत:साठी निवडणे पसंत करता. तसेच जी गोष्ट स्वत:साठी नापसंत करता ती इतरांसाठीच पसंत करू नका. एवढे केले तर मग खुशालपणे आपले प्राण ईश्वराच्या स्वाधीन करा.

हे बादशाह ! मीसुद्धा आपणास असाच सल्ला देतो. मी आपणास त्या दिवसाचे भय बाळगण्याची जाणीव करून देतो की, ज्या दिवशीच्या केवळ कल्पनेनेच मोठमोठ्या शूरवीरांच्या काळजाचे पाणी होते. ईश्वराने आपल्यावर कृपा करो की, आपल्याजवळ उमर बिन अब्दुल अज़ीज़ यांच्या सल्लागारांसारखेच सल्लागार आहेत काय, जे तुमच्या भल्यासाठी तुम्हास नेक सल्ला देतील?"

बादशाह हारुन रशीद त्यांच्या शिकवणीने खूप प्रभावित झाला. त्याच्या डोळ्यांतून ढळाढळा अश्रू वाहू लागले. मुख्य सचिव फ़ज़ल फुझैल बिन अयाझ यांना म्हणाला, "हे गुरुवर्य! बादशाहबरोबर मृदुव्यवहार करावा." फुझैल बिन अयाज़ म्हणाले, "हे फ़ज़ल ! तुम्ही आणि तुमच्या साथीदारांनी बादशाहला नष्टतेच्या खाईत लोटले आणि आता मला सुचविता की, मी मृदु व्यवहार करावा." मग बादशाह हारून रशीदला उद्देशून म्हणाले, "हे राजन! माननीय उमर बिन अब्दुल अज़ीज यांच्याकडे एका राज्यपालाने तक्रार केली की, मला एवढे काम करावे लागते की, झोपण्याची सुद्धा सवड मिळत नाही. यावर उमर बिन अब्दुल अज़ीज़ (र) यांनी लिहिले की, 'हे बंधु ! नरकाग्नीतील लोक नरकाग्नीत नेहमी जागत राहतील आणि झोपू शकणारसुद्धा नाहीत. तुम्ही त्या प्रसंगाची कल्पना करा, जेव्हा तुम्हास एक दिवस आपल्या पालनकर्त्याकडे हजर करण्यात येईल. तुमची पावले त्या वाटेवर थरथरू लागतील."

राज्यपालाने जेव्हा आपल्या पत्राचे उत्तर वाचले तेव्हा तो थेट उमर बिन अब्दुल अज़ीज़ यांच्या भेटीस निघाला. भेट झाल्यावर उमर बिन अब्दुल अज़ीज़ यांनी विचारले, "कसे येणे केले?"

"तुमच्या पत्राने माझ्या ह्दयावर पडलेले पडदे काढून टाकले. आता मी कोणतीच राजकीय जवाबदारी उचलण्याच्या मन:स्थितीत नाही."

फुझैल बिन अयाज़ यांचे शब्द ऐकून बादशाह हारून रशीद ओकसाबोकसी रडू लागला. तो म्हणाला, "गुरुवर्य ! आणखीन उपदेश करावा." फुझैल बिन अयाज़ म्हणाले, 'हे

बादशाह ! आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांचे काका माननीय अब्बास (र) एकदा प्रेषितांच्या सेवेत हजर होऊन म्हणाले, "हे प्रेषित! मला एखाद्या भूप्रदेशाचे राज्यपालपद सोपवावे." यावर आदरणीय प्रेषित म्हणाले, "हे काका! तुमचे तो प्राण ज्याला तुम्ही सुरक्षित ठेवू शकाल, त्या शासनापेक्षाही खूप श्रेयस्कर आहे की, ज्याची जवाबदारी तुम्ही घेऊ इच्छिता. राज्य शासन हे अंतिम निवाड्याच्या दिवशी घोर पश्चात्तापाचे कारण असेल. म्हणून शक्य होईल तेवढे स्वत:स शासनाच्या जबाबदाऱ्यांपासून दूर ठेवलेलेच बरे."

हारुन रशीद बादशाहास परत एकदा रडू कोसळले आणि म्हणू लागला, "गुरुवर्य! आणखीन उपदेश करावा! ईश्वर आपल्यावर दया करो!" फुझैल बिन अयाज़ म्हणाले, "हे सौंदर्यवाना! अंतिम निवाड्याच्या दिवशी ईश्वर तुला रयतेच्या बाबतीत जाब विचारेल. या चेहऱ्यास नरकाग्नीपासून वाचवू शकत असल्यास वाचव. जीवनाचा काळ अशा तऱ्हेने व्यतीत कर की, तुझ्या मनात आपल्या रयतेची काळजी असावी. रयतेचे अपार प्रेम तुझ्या अंत:करणात असावे. आईस ज्याप्रमाणे आपल्या मुलांविषयी प्रेम आणि काळजी असते, त्याचप्रमाणे तुमच्या अंत:करणात रयतेचे प्रेम आणि काळजी असावी. आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांची प्रत्येक सकाळ आणि जीवनाचा प्रत्येक क्षण रयतेच्या ऐहिक आणि पारलौकिक काळजीत व्यतीत होत असे. प्रेषितांनी म्हटले की, ज्या बादशाहच्या मनात आपल्या रयतेविषयी थोडा जरी द्वेष असेल तर तो स्वर्गाचा गंधदेखील घेऊ शकणार नाही."

बादशाह हारून रशीद गुरुवर्यांचे उपदेश ऐकत होता आणि आत्मपरीक्षण करीत होता. त्याच्या डोळ्यांतून पश्चात्तापाचे अश्रू ढळाढळा वाहत होते. मग तो गुरुवर्यांना म्हणाला, "आपल्यावर एखाद्याचे कर्ज आहे काय?"

"होय आहे !" फुझैल ताड़कन उत्तरले, "माझ्या पालनकर्त्याचे माझ्यावर खूप मोठे कर्ज आहे आणि यांच कर्जाचा हिशेब ईश्वर माझ्याकडून घेणार आहे. तो दिवस माझ्याकरिता खूप कठीण सिद्ध होईल. त्या दिवशी माझी वकिली करणारा आणि मदत करणारा कोणीच नसेल."

"माझा विचारण्याचा उद्देश असा की, सध्या तुमच्यावर एखाद्या माणसाचे आर्थिक कर्ज आहे काय?" बादशाहने विचारले,

"माझ्या निर्माणकर्त्या ईश्वराने मला आदेश दिला की, त्याच्या अश्वासनावर विश्वास ठेवावा आणि त्याचीच आज्ञा पाळावी. ईश्वराने दिव्य कुरआनात म्हटले की, "मी जिन आणि मानवास केवळ माझ्या दासत्वास्तव निर्माण केले. मला त्यांच्याकडून उपजीविका मिळविण्याची इच्छा नाही, तसेच त्यांनी मला खाऊ घालावे अशीही माझी इच्छा नाही." निश्चित:च ईश्वरच उपजीविका देणारा आणि सामर्थ्यशाली आहे." गुरुवर्यांनी उत्तर दिले.

बादशाह हारून रशीद म्हणाला, "हे एक हजार दीनार माझ्याकडून छोटीशी भेट म्हणून स्वीकारावे आणि आपल्या निर्मात्याच्या आराधनेत शक्ती मिळवावी."

"वाहवा! मी तुम्हाला सन्मार्गाचे दर्शन घडविले आणि तुम्ही त्याचा मोबदला देऊ इच्छिता.." फुझैल म्हणाले बादशाह हारून आणि सचिव फ़ज़ल गप्प बसतात. थोड्या वेळानंतर दोघेजण गूपचुपपणे उठून बाहेर निघतात. रस्त्यात बादशाह हारून रशीद म्हणाला, "अशा लोकांकडूनच माझ्या मनातली सल दूर होते. अशाच लोकांना मी पाहण्यासाठी व भेटण्यासाठी आतूर असतो."

(२)

हे आहेत त्यागी पुरुष, यांच्याच झोपडीमध्ये राजदरबाराचा सामर्थ्यशील बादशाह मनाची शांती आणि समाधान मिळविण्यासाठी आला. हाच त्यागी स्वभाव दिव्य कुरआनच्या शिकवणीचा अद्‌भुत आविष्कार आहे. मनाची शांती आणि समाधान राजप्रासादात, मऊ बिछाण्यावर आणि सिंहासनावर मिळत नसून त्यागी जणांच्या हृदयात, त्यांच्या चंद्रमोळी झोपडीत आणि त्यांच्या उपदेश व शिकवणीत मिळते. याचे जिवंत उदाहरण आपण या प्रकरणात पाहिलेच आहे. इस्लामी शिकवणीच्या पूर्वी मानवाचे जीवन किती अशांत होते. माणूस अन्याय अरेरावी व अत्याचारास बळी पडलेला होता. विनाश आणि लूटमारच त्याचा व्यवहार असतो. फुझैलचीसुद्धा काही अशीच अवस्था होती. त्याचे नाव ऐकूनच सामान्य लोकांच्या जीवाचा थरकाप उडत असे, परंतु एक दिवस अचानक त्याच्या जीवनात क्रांती घडवून आणणारी एक घटना घडली आणि त्याचे जीवनच पार बदलून गेले.

त्याचे झाले असे की, हा तरुण वयात आला होता. इतर लुटारू आणि दरोडेखोराप्रमाणेच फुझैल बिन अयाज़ दिवसा आणि रात्रीच्या वेळी लूटमार, वाटमारी आणि उपद्रव माजवीत असत. वाटेल ते करण्याची मानसिकता आणि संपत्ती मिळविण्यासाठी वाटेल त्याचे रक्त सांडण्याची तयारी त्यांच्या स्वभावात होती. एकदा झाले असे की, फुझैल हे एका दासी असलेल्या तरुणीच्या नजरेने पार घायाळ झाले. ते रात्रीच्या वेळी त्या तरुणीशी गुपचूप गुपचूप भेटू लागले. एकदा रात्रीच्या वेळी तिच्या घराच्या भिंतीवरून उडी मारून शिरू लागताच दिव्य कुरआनचे हे शब्द त्यांना ऐकू आले,

"श्रद्धावंतासाठी अजूनही ती वेळ येऊन ठेपली नाही काय की त्यांची मने ईश्वरी-कोपच्या भीतीने भयभीत होतील !" (दिव्य कुरआन)

ही एक विलक्षण वेळ आणि संयोग होता. रात्रीची निरव शांतता आणि या निरव शांततेत कोणीतरी कुरआनची ही आयत पठण करीत होते व याने फुझैल बिन अयाज यांचे मन

अतिशय प्रभावित झाले. दिव्य कुरआनचा हा संदेश फुझैलवरील अज्ञानाच्या कवचांना भेदत थेट त्यांच्या अंत:करणात शिरला. त्यांची पावले जागीच थबकली. हृदयात काहूर माजले. डोळ्यांतून पश्चात्तापांचे अश्रू वाहू लागले आणि त्यांच्या मुखातून उद्गार निघाले, "होय! हे माझ्या ईश्वरा, ती वेळ आता येऊन ठेपली आहे !!!"

त्यांनी तत्काळ आपली दिशा बदलली. ते आपल्या घराकडे चालू लागले. रस्त्यात एक काफ़िला मुक्कामास होता. काफिल्याचे लोक आपसात गप्पा गोष्टी करीत होते. त्यात काहीजण म्हणाले की, "आता आपण येथून कूच करावयास हवे. कदाचित फुझैल आपल्या मागावर असेल. पाहता पाहता तो आपल्यावर तुटून पडेल." त्यांचे हे हितगुज फुझैल ऐकत होते. हे शब्द त्यांच्या मस्तकावर धनाप्रमाणे आदळत होते. ते विचार करू लागले की, "आजपर्यंत मी किती अपराध केले? लोक माझ्यामुळे किती भयभीत आहेत? ते माझा किती तिरस्कार करतात?" त्यांचे अश्रू अनावर झाले. मनोमन त्यांनी प्रार्थना केली, 'हे ईश्वरा ! मी तुझ्या दरबारी तुझी शपथ घेऊन निश्चय करतो की, यापुढे मी हा पापमार्ग सोडून देतो. तू मला क्षमा कर !'

आता हे फुझैल लुटारू फुझैल राहिले नसून त्यांच्या जीवनाची कायाच पालटून गेली. कठोर असलेले मन अगदीच कोमल झाले. मानवांना लुटणारे आणि त्यांचे रक्त सांडणारे फुझैल आता अत्याचारपीडितांचे अश्रू पूसू लागले. त्यांनी दिव्य कुरआन आणि प्रेषित मुहम्मद (स) यांच्या जीवनाचा सखोल अभ्यास केला आणि एवढे महान सदाचारी व विद्वान बनले की, तत्कालीन बादशाहसुद्धा मन:शांतीकरिता आपला राजमहाल सोडून त्यांच्या झोपडीत आला.

(३)

माणसाने दुष्कर्म का सोडावेत? कशासाठी सन्मार्ग स्वीकारावा? का बरे इतरांना दुखवू नये? इतरांचा प्राण, संपत्ती आणि शीलता का हिरावू नये? काय पडले अत्याचार पीडितांचे अश्रू पुसण्यात? तहाणलेल्यास पाणी पाजून आणि भुकेल्यांचे पोट भरून आपला काय फायदा? दयाभाव, कृपा आणि मानवसन्मान या गोष्टींचा अर्थच काय शेवटी? माणूस एकदाच जन्मतो. मरून जातो. आपल्या इच्छा व आकांक्षापूर्तीसाठी त्याला हे सर्व पाप आणि अपराध करावेच लागतात आणि प्रत्येक जण करतोच. मग या नैतिकता, मानवता, पुण्य आणि सद्वर्तनाच्या फाजील गप्पा...

शेवटी फुझैल बिन अयाज लुटारूचा सन्मार्गी माणूस होतोच कसा? लुटमार आणि रक्तपातात जर त्याला धनदौलत आणि संपूर्ण सुखवस्तू उपभोगता येत होत्या, मग कोणत्या मन:शांतीस्तव त्याने ही सर्व दुष्कर्मे सोडून दिली? दासीच्या प्रेमात पडलेला आणि तिच्या मृगनयनी कटाक्षाने घायाळ झालेला फुझैल एवढा त्यागी झालाच कसा? असे किती फुझैल

बिन अयाज असतील की, ज्यांचे जीवन पार बदलून गेले आणि त्यांनी शक्ती व सामर्थ्याच्या बळावर पाहिजे असलेल्या वस्तू घेण्याऐवजी त्यांचा त्याग केला आणि त्यागामध्ये त्यांना शांती मिळाली? राजमहालात आणि भोगविलासात रमण्याऐवजी एवढा प्रचंड सामर्थ्यवान बादशाह हारून रशीद आपली साखरझोप सोडून कोणत्या शांतीच्या मागे धावत होता? त्याला झोपडीत राहणाऱ्या त्यागी पुरुषाच्या जवळच मनातली सल निघून गेल्याचे समाधान शेवटी झालेच कसे? कोणासमोरही न झुकणारा आणि कोणासमोरही न रडणारा राजा तेथे ओकसाबोकसी का बरे रडतो? राजाला तर रडतासुद्धा येत नाही, मग शेवटी कोणत्या कारणास्तव त्याला पश्चात्ताप झाला?

असे असंख्य प्रश्न मानवाच्या मनात काहूर माजवीत असतात. कधीकधी माणूस खूप खूप विचार करतो. अक्षरशः विचारांच्या जंगलात चाचपडत असतो. परंतु उत्तर मात्र सापडत नाही. कारण दुष्कर्म सोडा आणि सन्मार्ग स्वीकारा! केवळ अशा प्रकारच्या पोकळ उपदेशाने जगात कधीच क्रांती घडली नाही. आजही कोणताच माणूस केवळ उपदेशाने दुराचार सोडू शकत नाही. पूर्वीसुद्धा सोडू शकत नव्हता. केवळ उपदेशामध्ये जगात क्रांती घडवून आणण्यांचे सामर्थ्य कधीच नसते. नेमकी हीच चूक आज आपल्याकडूनही घडते. आपणही असा विचार करतो की, केवळ उपदेश करावा. सत्याची जाण करून द्यावी, म्हणजे समाजात आणि जगात सुधारणा घडेल. पण हे केवळ एक स्वप्न आहे. स्वप्न हे झोपेतच पडत असते. जाग आल्यावर स्वप्न भंग पावते. नेमकी हीच अवस्था आहे. कितीही महात्मे आणि धर्मात्मे उपदेश करून थकले. पण त्यांनी स्वप्नांना सत्य समजण्याची चूक केली आणि क्रांती घडणे हे केवळ स्वप्नच राहिले.

मग स्वप्न काय आहे आणि सत्य काय आहे? याचे उत्तर या ठिकाणी देणे तसे अवघड नाही. परंतु वेळही नाही. दिव्य कुरआनचा जर चिंतनपूर्ण अभ्यास केला, तर सत्य आणि स्वप्नातला फरक नक्कीच समजेल. हेच आहे ते रहस्य की दिव्य कुरआनच्या एकाच वाक्याने फुझैलसारख्या लुटारूचे जीवन बदलून टाकले. इतिहास साक्ष आहे की, केवळ एक फुझैल नव्हे तर कोट्यावधी माणसांनी जेव्हा दिव्य कुरआनास समजून घेण्याचा प्रयत्न केला, तर त्यांचे केवळ स्वतःचे जीवनच बदलले नसून अख्ख्या जगात क्रांती घडली. रक्तपात करणारे, अत्याचार करणारे आणि नैतिकतेचे शेपूटही माहीत नसणारे पीडितांचे आधार बनले. मानवी नैतिकता जोपासू लागले. त्याग आणि स्नेहभाव जोपासू लागले. शतकानुशतके जुने असलेले वैरी बंधुभावाने वागू लागले. स्वतः उपाशी राहून इतरांचे पोट भरू लागले.

## प्रकरण पंधरावे

'त्याग' सत्यासमोर आत्मसमर्पण करण्याचे आणि ईश्वराच्या मर्जीवर राजीखुशीने जगण्याचे नाव आहे. 'त्याग' हे आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांनी आपल्याकडे सोपविलेली अनामत असून आपण या ठेवीचे जतन करणारे आहोत. याची साधनसामुग्री दिव्य कुरआनची पवित्र शिकवण होय. त्यागी माणुस खूप कमी बोलतो. परंतु त्याचे बोलणे मानवतेस नैतिकतेचा आत्मा प्रदान करते. समाजास संजीवनी देते. त्यागी माणूस बादशाहच्या सामर्थ्यास न घाबरता भल्याभल्या लष्कर आणि आयुध शक्तींना पराजित करतो. त्याच्या साध्या जीवनमानाने मोठमोठी सिंहासने आणि राजप्रासाद हादरून जातात.

(१)

हा सुलतान झाहिरी रुक्नुद्दीन शासनकाळ होता. या काळात खूप अरेरावी आणि उपद्रव माजलेला होता. सलाहुद्दीन अय्युबी या ईशपरायण शासकाने क्रूर ख्रिश्चनांचा उपद्रव ठेचून काढला होता. तरीसुद्धा सीरिया आणि पॅलेस्टाईनच्या काही भागावर त्यांचा अजूनही प्रभाव होता. संधी मिळताच ते मुस्लिमांवार हल्ले करीत असत. एकीकडून मंगोलियन तातारींचे सतत हल्ले होत होते. त्यांच्या सामर्थ्यासमोर बगदादचे बादशाही सामर्थ्यसुद्धा कमी पडताना दिसत असे. त्यांनी बगदाद शहराला उद्ध्वस्त करून टाकले होते. आता या मंगोलियन उपद्रव्यांनी आपला मोर्चा सीरिया आणि इजिप्तकडे वळविला होता. परंतु सुलतान झाहिरीसमोर त्यांचा टिकाव लागत नव्हता. सुलतान मुझफ़्फ़रचा लष्करप्रमुख असताना त्याने मंगोलियन तातारींना पहिल्यांदा पराभवाची धूळ चारली होती. म्हणून मंगोलियन तातारींच्या अमानुष उपद्रवास ठेचून काढण्याची सर्वस्वी जबाबदारी त्याच्यावर येऊन पडली होती. तो एका छोट्याशा राज्याचा शासक होता. तरी पण मुस्लिमजण आणि मुस्लिमेतर मानवसमाजाच्या रक्षणास्तव त्याने दंड थोपटले आणि शत्रूच्या लष्करास धूळ चारली. त्याने एक एक करून संपूर्ण भागास शत्रूच्या तावडीतून सोडविले.

(२)

अशाच एका मोहिमेवर सुलतान झाहिरी रवाना झाला. त्याने इस्लामी विद्वानांची परिषद घेऊन त्यांच्याकडून शत्रूला पराभूत करण्यासाठी रयतेकडून वर्गणी गोळा करण्याची परवानगी मागितली. सर्व धर्मपंडित आणि विधिज्ञांनी या गोष्टीची त्यास परवानगी दिली. सुलतानाने विचारले, "आणखीन कोणी धर्मज्ञ बाकी आहे काय?' "होय ! आहेत !" सभेतून सूर उमटला. "इमाम मुहियुद्दीन (जन्म ६३१, मृत्यू ६७६ हि. स.) बाकी आहेत." सुलतान ने त्यांना बोलावून घेतले. "आपणही इतर तज्ज्ञांप्रमाणे परवानगीचा फथवा लिहून द्यावा." सुलतान नम्रपणे म्हणाला. परंतु इमामसाहेब त्यास नाकारतात. "का?" सुलतानाने प्रश्न केला.

"मला माहीत आहे की, आपण अमीर बंदक़दारचे खरीदलेले गुलाम आणि हस्तक होते. मग ईश्वराशी तुमच्यावर कृपा झाली आणि तुमच्या हाती शासनाची धुरा दिली. आता तुमच्याजवळ एक हजार गुलाम आणि संपूर्ण सुखवस्तू आहेत. त्याचप्रमाणे राजमहालात तुमच्याकरिता दोनशे सुंदर दासी आहेत, ज्या दागदागिन्यांनी नटलेल्या आहेत. करिता जोपर्यंत तुम्ही या गुलाम आणि दासींकडून युद्ध खर्चाची वर्गणी घेत नाहीत, तोपर्यंत गरीब जनतेकडून मी वर्गणी गोळा करण्याची आपणास परवानगी देऊ शकत नाही." इमामसाहेबांनी सडेतोडपणे आपली भूमिका मांडली.

सत्य खूपच कडवे आणि तीक्ष्ण असते. ही तीक्ष्णता आणि कडवेपण प्रत्येक शासकास सलत असते. सुलतानसुद्धा यास अपवाद नव्हता. तो संतापला त्याने इमामसाहेबांना देशातून हद्दपार करण्याचे आदेश दिले. "ईश्वराची भूमी तुझ्या शासनहद्दीपेक्षा खूप मोठी आहे." असे म्हणून इमामसाहेब चालते झाले.

इमामसाहेबांना देशाबाहेर काढून टाकण्याची वार्ता वणव्याप्रमाणे पसरली आणि सुलतानच्या या आदेशाने समस्त रयतेचा प्राण कळवळला. इस्लामी धर्मपंडित व विधिज्ञ आणि शासनाधिकारी सुलतानदरबारी हजर होऊन सुलतानास विनंती करतात की, इमामसाहेब या देशातील रयतेचा प्राण असून त्यांना देशाबाहेर काढण्याचा आदेश रद्द करावा. सुलतान त्यांच्या विनंतीस मान देऊन आपला आदेश परत घेतो. परंतु इमामसाहेब आपल्या भूमिकेवर ठाम आहेत. त्यांनी सुलतानास बजावले की, जोपर्यंत सुलतान झाहिरी दमास्कसमध्ये असेल, मी परत येणार नाही."

या घटनेस एक महिनाही लोटत नाही आणि सुलतान या जगाचा निरोप घेतो आणि इमामसाहेब शहरात परत येतात.

एकदा सुलतान झाहिरीने आदेश दिला होता की, दमास्कस शहरवासीयांची सर्व संपत्ती जप्त करण्यात यावी आणि जोपर्यंत प्रत्येक नागरिक आपल्या संपत्तीचा पुरावा सादर करीत नाही, परत केली जाणार नाही. संपूर्ण शहरवासीयांना शाही आदेशाची चिंता पडली. त्या वेळी इमामसाहेबांनीच शासनाच्या जुलमी आदेशाविरुद्ध आवाज उठविला. त्यांनी सुलतानास एक पत्र लिहिले आणि ईश्वराचे भय बाळगण्याचा सल्ला देताना लिहिले की,

दिव्य कुरआनात ईश्वराने म्हटले की,

'एक दुसऱ्यांना आपल्या कर्तव्याची जाण करून द्या. हे तुमच्याकरिता फायद्याचे ठरेल.' (सूरह-ए-झारियात : ५५)

चांगुलपणा आणि ईशपरायणतेत आपसात सहकार्य करा. आणि पाप व बंडखोरीत एक

दुसऱ्यांची मदत करू नका. आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांनी म्हटले, दीन (धर्ममार्ग) शुभचिंतन आणि ईष्ट कार्याचे नाव आहे. ईशग्रंथ हेच सर्वांच्या नेतृत्वाकरिता लाभदायक आहे. या शिकवणींची अशी मागणी आहे की, आम्ही आपणास इस्लामविरोधी कृत्याची जाण करून द्यावी आणि याचीसुद्धा जाण करून द्यावी की, ईश्वराने शासनकर्त्याचे हे कर्तव्य सांगितले आहे की, राजाने रयतेशी प्रेमाने वागावे. त्यांच्या गरजा पूर्ण कराव्यात. दुबळ्यांना साहाय्य करावे आणि त्यांच्या अडचणी व समस्यांचे समाधान करावे.

ईश्वराने दिव्य कुरआनात म्हटले आहे,

"श्रद्धावंतांशी मृदूतेने आणि नरमाईने वागावे."

आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांनी म्हटले आहे,

"दुर्बल आणि अनाथ व असहाय्य जणांवर दया करूनच ईश्वर तुमची मदत करतो आणि तुम्हास उपजीविका प्रदान करतो, ज्या माणसावर रयतेची जबाबदारी टाकण्यात येते आणि तो त्यांच्याशी चांगले वर्तन करतो तर ठीक, अन्यथा जर त्याने अन्याय व अत्याचाराचा मार्ग अंगीकारला तर ईश्वरही त्याच्यावर सक्ती करेल."

हे सुलताने! ईश्वराने आपणास शासन प्रदान करून मुस्लिम व इतर जनसमुदायावर मोठे उपकार केले. तो आपल्याकरवी आपल्या धर्मरक्षणाचे कार्य घेईल आणि श्रद्धावंतांची मदत व सुरक्षेचे कार्य करून घेईल. ईश्वराने आपणास अल्प मुदतीत मोठमोठे विजय मिळवून दिले आणि आपला दर्जा वाढविला. आपल्या शत्रूला अपमानजनक पराभव पत्करावा लागला. त्यांच्यावर आपला दरारा निर्माण केला. तुमच्या तलवारीने असत्याचा नाश केला. संपूर्ण देशात सुखशांती नांदत आहे. आपणा सर्वांवर अर्थात राजा व रयतेवर ईश्वराने जी बक्षिसे आणि अनुग्रहांचा वर्षाव केला असल्याने त्याच्या उपकाराची कृतज्ञता व्यक्त करावयास हवी की जेणेकरून ईश्वरीय बक्षिसांत आणखीन वाढ होईल. ईश्वराने कुरआनात म्हटले आहे,

"जर तुम्ही कृतज्ञता व्यक्त कराल तर मी तुम्हाला भरपूर प्रदान करेन, आणि तुमच्या उपजीविकेत व सुख समृद्धीत वाढ करीन."

हे सुलतान! रयतेच्या संपत्तीवर शासनाचा ताबा आणि मालकी हक्क असण्याच्या दस्तावेजी पुरावे सादर करण्याच्या मागणीमुळे आतोनात नुकसान झाले आहे. त्याचे वर्णन करणे देखील शक्य नाही. कोणताही धर्मपंडित आपले जातीचे आदेश वैध आणि धर्मसंमत ठरवू शकत नाही. जगातील सर्वच इस्लामी विधिज्ञ या निर्णयावर पूर्णपणे सहमत आहेत की, राहात असलेल्या आणि वापरत असलेल्या संपत्तीवर केवळ राहणाऱ्या आणि वापरणाऱ्या माणसाचाच वैध अधिकार असतो. त्याचे राहणे आणि वापरणे हाच त्याच्या मालकी अधिकाराचा पुरावा

आहे. तसेच विनाकारण त्याच्या संपत्तीचा पुरावा मागणे गैर आहे. आपल्याविषयी ही गोष्ट सर्वज्ञात आहे की, आपण इस्लामी विधीनुसार आचरण करता आणि धर्म मार्गानुसार शासन चालविता. तसेच आपल्या राज्यपालांनासुद्धा आपण धार्मिक नियमानुसार शासन चालविण्याचे आदेश दिले. म्हणून आपण आपला अवैध आदेश रद्दबातल ठरवून रयतेस या जोखडातून मुक्त करावे. ईश्वर आपणास सर्व प्रकारच्या जोखडातून मुक्त करो ! आपल्या रयतेत अनाथही आहेत, गोरगरीब आणि दुर्बलही आहेत. ईश्वराचे नेक दाससुद्धा आहेत. त्याचप्रमाणे असेसुद्धा लोक आहेत की, ज्यांच्यामुळेच ईश्वर सर्वांची मदत करतो. शिवाय प्रेषितांची जन्मभूमी आणि कर्मभूमी असलेल्या सीरिया देशाचे हे लोक रहिवासी आहेत. म्हणून सर्व पैलूंनी विचार केल्यास येथील जनता दया व कृपेस पात्र आहे.

या शाही आदेशामुळे रयतेवर जे संकट आले आहे. त्याचे हृदयद्रावक दृश्य स्वत: सुलतानने पाहिले तर आपणास निश्चितच अपार दु:ख आणि वेदना होतील. आपणच आपल्या जनतेच्या वतीने ईश्वराकडे याचना कराल.

या आदेशाने प्रभावित झालेले बहुतेक जण परंपरागत मिळालेल्या संपत्तीचे वारस असल्याने त्यांचे दस्तावेज शत्रूंच्या हल्ल्यात इतर दस्तावेजाप्रमाणेच नष्ट झाले. म्हणून पुरावा सादर करण्यास ते पात्र नाहीत. आपण त्यांच्यावर दया आणि नरमाई केली तर ईश्वर तुमच्यावर दया आणि नरमाईचा व्यवहार करील. पूर्ण रयत आपल्या स्थैर्यास्तव ईश्वर दरबारी प्रार्थना करील. या पत्राचा अंत मी आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांच्या वचनाने करतो. आदरणीय प्रेषित (स) यांनी म्हटले, "ज्याने एखादी सुव्यवस्थीत पद्धत चालू केली त्यास त्याचे पुण्य मिळेल आणि महाप्रलयापर्यंत जेवढे लोक या पद्धतीवर आचरण करतील तेवढ्यांचे पुण्य त्यास मिळेल. तसेच ज्या माणसाने एखादी दुष्ट आणि वाईट प्रथा जारी केली, त्याला महाप्रलयापर्यंत त्याचे पाप भोगावे लागतील."

(३)

हे आहेत इमाम मुहियुद्दीन (र) ज्यांनी सुलतान झाहिरीसमोर सत्य मांडले, त्याच्या चुकीच्या आणि अवैध आदेशांवर परखडपणे कानउघाडणी केली. त्याचा राग आणि संताप ओढवून घेतला. इमामसाहेब आपल्या काळातील प्रसिद्ध विद्वान, प्रेषित वचनांचे तज्ज्ञ आणि कुरआनचे गाढे अभ्यासक होते. त्यांनी केवळ वयाच्या सत्ताविसाव्या वर्षापर्यंतच एकोणीस धर्म ग्रंथ लिहिले. हे ग्रंथ इस्लामी विधी, प्रेषित जीवनचरित्र, भाषाशास्त्रसारख्या प्रगल्भ विषयांवर आधारित आहेत.

मुलाचे पाय पाळण्यात दिसतात. या म्हणी प्रमाणेच इमाम साहेबांची विद्वत्ता

लहाणपणापासूनच प्रसिद्धीझोतात आली. त्यांचे वडील दमास्कसमध्ये दुकानदारीचा व्यवसाय करीत असत. वडिलांनी मुलाच्या शिक्षणावर विशेष लक्ष दिले. मुळगावी रात्रंदिवस अभ्यासात रमला त्याच्यात स्मरणशक्ती व आकलन शक्ती प्रचंड होती.

अशा प्रकारे इमाम मुहियुद्दीन शान आणि विद्वत्तेचे सागर बनले. तसेच ते केवळ विद्वानच नव्हते तर आपल्या ज्ञानाचा व्यावहारिक जीवनात ते काटेकोरपणे वापर करीत असत. तसेच त्यांचे राहणीमानही अत्यंत साधे आणि विनयशील होते. ज्ञानासहित आचरण नसेल तर त्याचे स्वरुप आत्महीन शरीराचे असते. यामुळे नजर धोका खाऊ शकते परंतु जीवंनात ऊब येऊ शकत नाही. आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांनी म्हटले आहे की, 'जगामध्ये प्रवाशाप्रमाणे राहावे की ज्याप्रमाणे प्रवासी आपल्या प्रवासामध्ये एखाद्या झाडाखाली दुपारच्या वेळी थोडासा विरंगुळा घेतो.' म्हणूनच इमामसाहेब सुखवस्तूंना सहसा जवळ येऊ देत नसत.

इमाम मुहियुद्दीन यांनी आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांच्या वचनांतून चाळीस मौल्यवान हिरे निवडले आहेत. आपणही त्यापासून लाभ घेऊ या.

१) उमर बिन खत्ताब (र) कथन करतात की, मी आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांना असे सांगताना ऐकले की,

"प्रत्येक माणसाला त्यांच्या आंतरिक विचाराचे फळ मिळेल. ज्याने ईश्वर आणि प्रेषितत्वाकरिता स्थलांतर केले, त्याचे स्थलांतराचे पुण्य कर्म ईश्वर आणि प्रेषिताकरिताच गणले जाईल. तसेच ज्याने स्थलांतर हे ऐहिक संपत्ती मिळविण्याकरिता अथवा एखाद्या स्त्रीशी लग्न करण्यासाठी केले असेल, त्याचे स्थलांतर हे त्याच गरजेस्तव गणले जाईल, ज्या गरजेखातर त्याने स्थलांतर केले असेल."

२) आदरणीय प्रेषितांचे नातु 'हसन बिन अली (र)' कथन करतात की, मी आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांचे हे वचन पक्के स्मरणात ठेवले की,

"कोणताही माणूस तोपर्यंत श्रद्धावंत (मुस्लिम) होऊ शकत नाही, जोपर्यंत तो आपल्या बांधवाकरिता तीच गोष्ट पसंत करीत नाही, जो स्वत:करिता करतो."

३) अबू हुरैरा (र) आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांचे वचन कथन करतात,

"जो माणूस ईश्वर आणि परलोकावर विश्वास आणि श्रद्धा बाळगतो, त्याने केवळ चांगलीच आणि लाभदायक गोष्ट बोलावी, अन्यथा गप्प बसावे. तसेच आपल्या शेजाऱ्याचा सन्मान करावा आणि पाहुण्यांचा चांगल्याप्रकारे पाहुणचार करावा."

४) अरबाज बिन सारिया (र) म्हणतात की, एक दिवस आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांनी आम्हास उपदेश केला ज्यामुळे आमची मने हादरून गेली आणि डोळ्यांतून अश्रू वाहू लागले. आम्ही विचारले, 'हे प्रेषिता ! हे तर जणू निरोप घेतानाचे उपदेश आहेत. करिता आम्हास अंतिम सूचना द्याव्यात.' प्रेषितांनी उत्तर दिले,

"मी तुम्हाला ईश्वराचे भय बाळगण्याची त्याची नेहमी आज्ञापालन करण्याची सूचना (अर्थात मृत्युपूर्व सूचना) करतो मग गुलाम असो वा मालक. माझ्या पश्चात जो जीवित राहील तो लवकरच खूप विवाद आणि मतभेद पाहील. अशा प्रसंगी तुम्ही माझे आणि माझ्या नंतरच्या चार इस्लामी शासकांचेच अनुकरण करावे. या मार्गदर्शनावर अतिशय काटेकोरपणे आचरण करावे आणि त्यात कोणतीच नवीन बाब सामील करू नका. कारण यामुळे तुम्ही मार्गभ्रष्ट व्हाल."

५) अबू सईद खुदरी (र) कथन करतात की, आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांनी म्हटले,

"तुमच्यापैकी ज्या माणसाने कोणासही वाईट कृत्ये करताना पाहिल्यास त्याने बलपूर्वक तो वाईट कृत्ये नष्ट करावीत. बळ नसल्यास मुखाने विरोध करून रोखावे. तेवढेही बळ नसेल तर कमीतकमी स्वत:तरी अपराधी कृत्यास वाईट समजावे आणि हा श्रद्धेचा शेवटचा दर्जा आहे."

६) अबू हुरैरा (र) कथन करतात की, आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांनी म्हटले आहे,

"आपसात एक दुसऱ्यांचा द्वेष करु नका, किमंती वाढवू नका, वैरभाव बाळगू नका. तेढ निर्माण करू नका, आणि ईश्वराच्या दासांनो, बांधवाप्रमाणे राहा. मुस्लिम हा मुस्लिमांचा बंधु असतो. तो आपल्या बंधुवर कधीच अन्याय करीत नसून त्यास अनाथ आणि असहाय्य होऊ देत नाही. तसेच त्याच्या गोष्टी धिक्कारत नाही आणि त्यास अपमानितही करीत नाही. (आपल्या छातीकडे तीनदा संकेत करून तीन वेळेस म्हटले) ईशपरायणतेचे केंद्र येथे आहे (अर्थात अंत:करण) आपल्या बंधुस तुच्छ नजरेने पाहणे खूप मोठे पाप आहे. प्रत्येक मुस्लिमांसाठी इतर मुस्लिमांचे प्राण, शील आणि संपत्ती घेणे व बळकावणे निषिद्ध आहे."

७) अब्दुल्लाह बिन उमर (र) कथन करतात की, आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांनी म्हटले,

"तुमच्यापैकी कोणीच तोपर्यंत श्रद्धांवत (मुस्लिम) होऊ शकत नाही, जोपर्यंत आपल्या इच्छा-आकांक्षा त्या धर्माच्या ताब्यात देत नाही. जो धर्म मी घेऊन अवतरलो आहे."

समाप्त